*राष्ट्रीय चरित्रमाला*

# श्री अरविंद

## नवजात

अनुवाद

**म. अ. करंदीकर**




**नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया**

# आभार

प्रस्तुत ग्रंथलेखनाच्या कामी ज्या मित्रांनी आपुलकीने सूचना व साहाय्य केले त्या सर्वांचा- विशेषतः नलिनीकान्त गुप्त, अमल किरण, ज्यूली मेडलॉक, मेरी ऑल्ड्रिज व एम्. शिवदास यांचा ग्रंथकर्ता ऋणी आहे.

एम्.पी. पंडित यांनी आपल्या 'डिक्शनरी ऑफ श्री अरविंदाज योग' या ग्रंथातून उतारे घेण्यास परवानगी दिल्याबद्दल ग्रंथकर्ता त्यांचा विशेष आभारी आहे.

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

माताजींचे वसतिस्थान बनलेल्या प्रमुख घरात एक शांतिमय वातावरण विशेषच ठळकपणे जाणवते. त्या शांतिमय वातावरणाचा आस्वाद श्री अरविंद आश्रमाला भेट देणारे सहस्रावधी लोक मोठ्या आनंदाने घेत असतात. तिथे अंगणातच श्री अरविंदांची समाधी आहे. माताजीकडून 'सेवावृक्ष' हे नामाभिधान लाभलेला, जवळ जवळ पस्तीस फूट उंचीचा अवाढव्य वृक्ष (वनस्पति-विज्ञानातला पेल्टोफोरम फेरगिनिअम) त्या समाधीवरील नैसर्गिक छत्र म्हणून खडा आहे. समाधीभोवती साधकांच्या जोडीने दर्शनेच्छूही ध्यान करीत असतात, कोणाची आकांक्षा दैवी संपत्तीसाठी स्वतःचे अंतरंग खुले व्हावे ही असते, तर कोणाचा सगळा भर उन्मनी परिवर्तनावरच असतो; त्यांच्याव्यतिरिक्त दुसरे कोणी आपल्या आधिभौतिक व्यथा व अडचणी श्री अरविंदांच्या चरणी निवेदन करून सहाय्यासाठी आळवणी करीत असतात. प्रत्येकाला आपापल्या ग्रहणक्षमतेनुसार साहाय्य लाभतेही आणि त्यात काहीच नवल नाही. कारण माताजींनी सांगून ठेवलेच आहे;

"श्री अरविंद आपल्याला सोडून गेलेले नसून येथे त्यांचे जिवंत व व्यापक अस्तित्व आजही पूर्वीसारखेच सतत असते." आणि फिरून एकदा, "स्वामिन्, आपले कार्य पूर्ण होईतो, नुसत्या संवित्तीच्याच नव्हे, तर कार्यरत असलेल्या समर्थ 'सत्ते'च्याही स्वरूपात आपण आमच्यात राहाणार असल्याचे आश्वासन आपण मला आज सकाळी दिलेत. पृथ्वीचे परिवर्तन घडून येईपर्यन्त आपण सामग्र्याने येथेच असाल आणि पृथ्वीच्या वातावरणाचा त्याग करून जाणार नाही हे अभिवचन आपण निःसंदिग्ध शब्दांत दिलेले आहे. आता एवढा आशीर्वाद द्या की या अद्‌भुत 'सत्ते'ला आम्ही पात्र ठरू आणि इतःपर आमच्या साऱ्या शक्ती आपल्या उदात्त कार्याचे साफल्य साधण्यावरच केंद्रीभूत होऊन राहातील."

5 डिसेंबर 1950 च्या मध्यरात्रीनंतर (1 वाजून 26 मिनिटांनी) श्री अरविंदांनी देह ठेवला. एका उन्मनी तेजाच्या आवरणामुळे त्यांचा पार्थिव देह कुजला नाही. तो साडेचारांवर दिवस अशा प्रकारे अविकृत अवस्थेत राहिला होता आणि 9 डिसेंबर 1950 रोजी तिसऱ्या प्रहरी तो समाधिनिविष्ट करण्यात आला. फुलांच्या मनोरम चित्रकृतींनी सतत सुशोभित केल्या जाणाऱ्या त्यांच्या संगमरवरी समाधीवर पुढील शब्द कोरलेले आहेतः

"आमच्या स्वामीचे पार्थिव कवच बनून राहिलेल्या **तुज**विषयी आम्हाला असीम कृतज्ञता आहे. ज्याने आमच्यासाठी इतके केले-लढे दिले, अपेष्टा भोगल्या, आशा बाळगल्या, यातना सोसल्या-त्या **तुझ्या**-समोर, ज्याने आमच्याचसाठी सारे काही मिळविले त्या **तुझ्या** समोर प्रणिपात करून आम्ही विनवणी करीत आहो की **तुझ्या** या ऋणाचा आम्हाला अगदी एक क्षणभरदेखील विसर पडू देऊ नको."

श्री अरविंदांनी आमच्यासाठी सारे इच्छिले, साऱ्यांसाठी प्रयत्न केले, साऱ्याची योजना आखली आणि सारे काही मिळविले, ते कसे काय असा प्रश्न साहजिकच उद्भवतो.

या प्रश्नाचे उत्तर तसे सुलभही आणि कठीणही. श्री अरविंदांनी लिहून ठेवले आहेः "माझ्या जीवनाविषयी कोणालाच काही लिहिता येणार नाही. कारण ते माणसाच्या दृष्टोत्पत्तीस यावे असे बाह्य पृष्ठभागावरचे नाहीच मुळी!" परंतु माणसाला बाह्य पृष्ठभागावर दृग्गोचर होते तेवढे देखील अवाढव्य आहे. त्याप्रमाणेच स्वतःचे आंतरजीवन आणि आंतरिक स्तरावरील स्वतःचे कार्य यांवर श्री अरविंदांनी आपल्या लेखांतूनही प्रकाशझोत टाकलेला आहे. या जगासाठी त्यांनी काय काय केले याचे अनुमान त्या लेखनाच्या आधारे कोणालाही बांधता येईल.

शक्यतो श्री अरविंदांच्याच शब्दांचा पुनरुच्चार करण्याचा प्रयत्न प्रस्तुत ग्रंथात केला आहे. हेतू असा की वाचकाला आपल्या जाणिवेच्या स्तराच्या प्रमाणात त्याचे मूल्यमापन करता यावे आणि त्याने त्यांच्या लेखनात भरून राहिलेल्या आध्यात्मिक शक्तीचा लाभही करून घ्यावा.

भारतीय स्वातंत्र्यासाठी लढा देणारे महान राष्ट्रवादी म्हणून श्री अरविंदांची स्मृती अमर झाली आहे; एक महान लेखक आणि कवी म्हणूनही त्यांचा गौरव केला जातो; एक महान योगी या नात्याने त्यांच्याविषयी आदरभावही प्रकट केला जातो. परंतु ही सारी स्तुतिस्तोत्रे म्हणजे त्यांच्या दैवी व्यक्तित्वाचे आपल्याला जमणारे सीमित मूल्यमापन होय.

पाषाणातून वनस्पतीत, वनस्पतीतून जीवसृष्टीत आणि जीवसृष्टीतून मानवजातीत घडून येणाऱ्या निसर्गातल्या चढत्या उत्क्रांतीची कथा शास्त्रांनी सांगितलेली आहे. उत्क्रांतीची ही प्रक्रिया भारतीय पुराणांतून दशावतारांच्या कल्पनेत प्रतीकरूपाने अभिव्यक्ति झालेली आहे. मत्स्य, कूर्म, वराह, नृसिंह, वामन, परशुराम, राम, कृष्ण, बुद्ध व कल्की. श्री अरविंद सांगतातः "मानवजात ही या उत्क्रांति-प्रक्रियेतली मधली संक्रमणावस्था आहे, शेवटची स्थिती नव्हे. कारण उत्क्रांती याहीपलीकडे जाणार आहे. मानव हा एका मानसिक संवित्तीत जगत असतो आणि मन व प्रतिमा यांच्या पलीकडील सुप्त शक्ती – सत्य-संवित्ती, उन्मनी – त्याला लाभल्या आहेत. उत्क्रांतीच्या नैसर्गिक ओघातही उन्मनीपर्यन्त उत्क्रांती घडून येईल हे खरे असले तरी देखील त्याला सहस्रावधी वर्षे लागतील. उलट तिची गती वाढवल्यास ती येथेच आणि आतच घडवून आणता

येईल. मग पृथ्वीवरील जीवन पालटून जाईल. मानवाचे मन तेजोमय बनून त्याला सहजसिद्ध ज्ञान लाभेल. तसेच पार्थिवदेहात देखील परिवर्तन होऊन तो तेजोमय होईल. पृथ्वीच्या पाठीवरची प्रत्येकच गोष्ट पालटून जाईल आणि ईश्वरी जीवन ही एक प्रत्यक्षगोचर वस्तुस्थिती बनून राहील.

या परिवर्तनाची खरी महती सर्वांना पटेल ती एकात्म परिवर्तन घडून देहसुद्धा पालटून जाईल तेव्हाच. आज मात्र काही थोड्या जणांनाच तिचा साक्षात्कार घडू शकेल."

भावी काल श्री अरविंदांचा गौरव, उन्मनी युगाचा शुभारंभ घडून आणणारा अवतारी पुरुष म्हणून करील. या संदर्भात माताजींनी म्हटले आहेः "श्री अरविंदांनी मानवी देहात उन्मती संवित्तीचे अवतरण घडवून आणले आणि ध्येयाप्रत पोहोचण्याच्या दृष्टीने अनुसरावयाच्या मार्गाचे स्वरूप आणि तो अनुसरण्याची रीत आपल्यापुढे प्रकट केली, एवढेच नव्हे तर स्वतः व्यक्तिगत साफल्य साधून त्याद्वारा ही गोष्ट साध्य होण्याजोगी आहे व ती साध्य करण्याचा कालही आज आलेला असल्याचे प्रत्यक्ष प्रमाणही त्यांनी आपल्याला उपलब्ध करून दिले. उन्मनी परिवर्तनाच्या ध्येयाकडे जगाला घेऊन जाणारा अवतार या नात्याने त्यांना नैसर्गिक शक्तींशी दोन हात करण्याच्या अपेष्टा साहजिकच भोगाव्या लागल्या." 'सावित्री' या आपल्या महाकाव्यात श्री अरविंदांनी हे सत्य पुढील शब्दांत अभिव्यक्त केले आहे.

"अवतरतो जेव्हा दूत देवाचा जगाच्या सहाय्यार्थ,
न्यावे आत्म्याला उच्चतर ध्येयाप्रत म्हणून,
अवतरला तो जे उतरायला जू, वहावे लागते ते त्याला स्वतःच,
ज्या शमवायच्या कळा, त्या भोगल्या पाहिजेत त्यानीच प्रथम!"

श्री अरविंदांचा या पृथ्वीतलावरील अवतार नेमका याच हेतूसाठी झालेला होता. माताजी ठामपणे सांगतात, "जागतिक इतिहासाच्या अगदी प्रारंभकालापासूनच अशा महान भौतिक परिवर्तनांचे सूत्रसंचालन, या ना त्या स्वरूपात, या ना त्या नावाने, पण सतत श्री अरविंदांच्या हाती होते. त्यांचे समग्र पार्थिव जीवन म्हणजे विवक्षित परिस्थिती निर्माण करून उन्मनीचा आविष्कार साधण्याची अव्याहत खटपटच होय. दार्जिलिंगमध्ये आणि इंग्लंड देशात व्यतीत केलेल्या शैशवातून त्यांना इंग्रजी भाषेवरील सर्वांगपरिपूर्ण प्रभुत्व लाभले आणि संस्कृत भाषेतून आत्मप्रकटीकरण करणाऱ्या प्राचीन ऋषींप्रमाणे त्यांनीही उच्चतम शक्तींच्या प्रेरणेतून स्फुरलेले आणि आध्यात्मिक शक्तींनी व दीप्तींनी भारलेले गद्य आणि काव्य लिहिताना मंत्रतुल्य सामर्थ्य लाभलेल्या इंग्रजी शैलीतच आत्माविष्कार केला. त्यांचे लेखन माणसाचे उन्नयन करते. त्यांच्या स्वतःच्या आंतर साक्षात्काराचा आविष्कार आणि त्याप्रत पोहोचण्याचा उपाय अशा दोन्ही नात्यांनी ते महत्वाचे ठरते. इंग्रजीवर इतके प्रभुत्व त्यांनी संपादन केले नसते तर ज्या प्रभावी धाटणीने त्यांनी आत्माविष्कार केला आहे ती त्यांना शक्य झाली नसती आणि स्वतःचे

अनुभव सरळ इंग्रजीभाषिक जगापुढे मांडताही आले नसते

श्री अरविंदांनी भारताच्या स्वातंत्र्यार्थ चालवलेला लढा हाही पृथ्वीतलावर ईश्वरी साम्राज्य प्रस्थापित करण्याचा उपोद्घातच होय. शेवटी पाँडिचरीस स्थायिक झाल्यानंतर तर उन्मनीची चढण चढून जाण्याचाच केवळ नव्हे, तर उन्मनीचे तेज, ज्ञान व बळ ही मानसिक, प्राणमय व भौतिक पातळ्यांवर अवतीर्ण करून त्यांच्यांत परिवर्तन घडवून आणण्याचाही प्रत्यक्ष प्रयत्न त्यांनी आरंभला.

त्यांनी स्वतःच निवेदन केले आहेः "मी स्वतःसाठी असे काहीच करीत नाही. व्यक्तिशः मला कशाचीच-मोक्षाची किंवा उन्मनीकरणाचीसुद्धा— आवश्यकता नाही. मी उन्मनीकरणासाठी यातायात करतो आहे, ती पृथ्वीचे परिवर्तन साधण्याच्या दृष्टीने आवश्यक असलेली गोष्ट म्हणूनच."

1930-31 मध्ये माताजींनीही विवरण केले होतेः "संवित्ती ही एखाद्या शिडीसारखी असते. सर्वसामान्य संवित्तीला पूर्वीच्या सर्व अवस्थांहून उच्चतर अशा पातळीला पोहोचता यावे यासाठी या शिडीला आणखी एकेक जोड देण्याची क्षमता लाभलेली एकेक महान व्यक्ती प्रत्येक शुभकारी युगात होऊन गेलेली आहे. अत्युच्च पातळी गाठून भौतिक जाणिवेतून संपूर्णपणे बाहेर पडणेही शक्य आहे. मग मात्र माणूस ही शिडी ठेवीत नाही. उच्चतम पातळी गाठण्याचे सामर्थ्य, भौतिकाचा संबंध सुटून देता या शिडीला नवी जोड देण्याची क्षमता विकसित करून घेत असताना, इकडे एक प्रकारच्या सुनेपणाच्या आहारी जाण्याऐवजी, पाया आणि शिखर याची सांगड टिकवून ठेवणे हेच विश्वाच्या महान युगातले महत्तर कार्य होय. वर चढून खाली येणे आणि शिखर व पाया यांचा सांधा जोडून देणे हेच साक्षात्काराचे समग्र रहस्य असून अवतारी पुरुषाचे कार्यही तेज असते. अवतारी पुरुष या शिडीला एखादी नवी जोड देतो त्या त्या प्रत्येक वेळी पृथ्वीवर एक नवी सृष्टी निर्माण होत असते. सध्या जी नवी जोड दिली जात आहे तिला श्री अरविंद 'उन्मनी' म्हणतात. तिचे पर्यवसान म्हणून संवित्ती उन्मनी विश्वात प्रवेश करू शकेल आणि तरीही स्वतःचे व्यक्तिगत स्वरूप, स्वतःचे व्यक्तिवैशिष्ट्य टिकवून ठेवून ती येथे नवी सृष्टी प्रस्थापित करण्यासाठी खाली उतरू शकेल. अर्थात ही अवस्था अंतिम खचितच नाही, कारण तीहून उच्चतर असे जीवसृष्टीचे स्तर आहेतच. परंतु सध्या आपण उन्मनीला खाली आणून जगाची पुनर्रचना करण्याचे आणि जगाला फिरून ईश्वरी व्यवस्थेप्रत नेण्याचे कार्य चालविले आहे. सांप्रतः ही एका सुव्यवस्थेची निर्मिती, प्रत्येक वस्तूला तिच्या उचित स्थानी ठेवण्याची प्रक्रिया आहे. आज कार्यरत झालेली शक्ती, त्या दैवी सामर्थ्याचा प्रमुख आत्मा, म्हणजे सर्वांगपरिपूर्ण पुनर्घटनेची देवता, महासरस्वती ही होय.

ज्यामुळे माणसाला वर गेल्यावर खाली उतरण्याची आणि उच्च स्तरावर असेल ते भौतिक स्तरावर आणण्याची मोकळीक लाभते, ते सातत्य प्रस्थापित करण्याची प्रक्रिया

जाणिवेच्या आत चालू असते. ते कार्य ज्याच्यावर सोपविलेले असते तो अवतार कारागृहात जन्माला आला, किंवा त्याने कोणालाही पाहिलेले नसले, तरीही तो ते कार्य करतोच करतो; कारण ते जाणिवेच्या आतले, उन्मन आणि भौतिक जीव याची सांगड घालून देण्याचे कार्य असते. जाणिवेतली ही सांगड घालून देण्यासाठी त्याला मान्यता लाभण्याची किंवा कसल्याही बाह्य सामर्थ्याची जोड मिळण्याची आवश्यकता नसते. पण एकदा ही सांगड घातली गेली म्हणजे नंतर तिचे पर्यवसान मात्र बाह्य विश्वातील प्रारंभीच्या आदर्श नगरीपासून शेवटी सर्वांगपरिपूर्ण जगाच्या प्रस्थापनेच्या स्वरूपात घडायला हवेच.

राजकीय, सामाजिक व आर्थिक अशी विविध ध्येये मानवजातीसमोर ठेवली गेलेली आहेत आणि त्यांच्या सर्वश्रेष्ठ स्वरूपाच्या द्वारा प्रत्येकाला स्वतःच्या सर्वोच्च आंतर व बाह्य क्षमतांचे सार्थक करून घेता येईल अशा एखाद्या नव्या जीवनसरणीचा शोध मानवता चाचपडत आणि चुकतमाकत करीत आहे. परंतु अधिक गतिमान बनविलेल्या भावी उत्क्रांतीचे ध्येय मात्र मानवतेसमोर क्वचितच ठेवले गेले. खरे सुख, पूर्ण शांती आणि निःशेष ज्ञान यांचे मानवता ज्याच्यासाठी प्रयत्नशील आहे त्या साऱ्याचेच— साफल्य या पुढल्या उत्क्रांतीतच सामावलेले आहे. आपल्यापुढे आज असलेल्या समस्यांची उत्तरेही या उत्क्रांतीतच मिळणार आहेत.

प्रस्तुत ग्रंथाने वाचकांतल्या काही थोड्यांनाही उन्मनी जीवनाची प्रेरणा दिली तरी त्याचा हेतू सफळ झाला असे म्हणता येईल.

**नवजात**

1

# बाल्य

श्री अरविंदांचा जन्म कलकत्यास बॅरिस्टर मनमोहन घोष यांच्या निवासस्थानी, 15 ऑगस्ट 1872 मध्ये सूर्योदयाच्या तासभर आधी, पहाटे साडेचार वाजता झाला. त्यांचे वडील डॉ. कृष्णधन घोष हे शासकीय वैद्यक विभागातले अधिकारी होते. त्यांच्या मातोश्री स्वर्णलतादेवी या भारतीय संस्कृतीचे विख्यात भाष्यकार, ऋषी राजनारायण बोस, यांच्या ज्येष्ठ कन्या. श्री अरविंद हे त्यांचे तिसरे चिरंजीव. त्यांच्या वडील भावांची नावे विनयभूषण व मनमोहन अशी होती.

श्री रामकृष्ण परमहंस पंधरा ऑगस्टला समाधिस्थ झाले. विधीने भारताच्या स्वातंत्र्यलाभासाठीही हाच शुभ दिनांक नियुक्त केला होता. या दिनांकाचे आध्यात्मिक माहात्म्य श्री अरविंदांनी स्पष्ट केलेले आहे. पंधरा ऑगस्ट हा कुमारी माता मेरी हिच्या 'आधानाचा **(assumption)** दिवस. भौतिक प्रकृतीचे उदात्तीकरण दैवी प्रकृतीत झाले असा त्या आधानाचा अर्थ. कुमारी मेरी ही भौतिक प्रकृतीची द्योतक असून येशू हा तर मानवी देहात जन्मलेला दैवी आत्मा. तो देव आणि मानव दोहोंचाही पुत्र ठरतो.

राजनारायण बोस व त्यांचे जावई, कृष्णधन घोष, यांच्या भारतीय व युरोपीय संस्कृतीविषयीच्या मतांत पराकाष्ठेचा विरोध असे. राजनारायण यांनी इंग्रजाळलेल्या बंगाली लोकांना भारतीय संस्कृतीकडे आणि रीतिभातीकडे वळवून आणण्याचा प्रयत्न इ. स. 1861 पासूनच चालवला होता. लेखन व भाषण बंगालीतून करावे, युरोपीय वेषभूषा टाकून धोतर व उपरणे वापरावे, भारतीय क्रीडा व व्यायाम यांचा अंगीकार करावा, भारतातील आयुर्वेदाचा प्रचार करावा, इत्यादी दृष्टींनी ते लोकांना प्रोत्साहन देत असत. त्यांच्या अंतःकरणात मातृभूमीविषयी उत्कट भक्तिभाव वसत असून तिच्या महान इतिहासाचीही त्यांना चांगली जाणीव होती. तिचे भवितव्य तर अधिकच महान आहे असा त्यांचा दृढ विश्वास होता. भारताच्या स्वातंत्र्यासाठी चळवळ करण्याकरिता त्यांनी एक गुप्त मंडळही स्थापन केले होते. बलप्रयोग करून या देशाच्या शत्रूंचा निःपात करण्याची शपथ या मंडळाच्या सदस्यांना घ्यावी लागे. रवींद्रनाथ टागोर व त्यांचे बंधू ज्योतींद्रनाथ दोघेही या मंडळात होते. डॉ. कृष्णधन घोष मात्र आपल्या श्वशुरांच्या विचारांशी सहमत नसत. वस्तुतः ते अत्यंत कर्तृत्ववान असून त्यांचे व्यक्तित्वही विलक्षण

प्रभावी होते. शिक्षणासाठी ब्रिटनला गेलेल्या पहिल्या मूठभर विद्यार्थ्यांतले ते एक होत. ॲबर्डीन विद्यापीठाची वैद्यकीय पदवी मिळवून भारतात परतले तेव्हा ते सवयी, विचारसरणी व आदर्श या सर्वच प्रांतांत संपूर्णतया इंग्रजाळलेले होते.

आपल्या मुलांचे लालनपालन सर्वतोपरी युरोपीय पद्धतीनेच झाले पाहिजे असा श्री. कृष्णधनांचा निर्धार होता. अरविंद बालवयात इंग्रजी व हिंदुस्थानी याच भाषा बोलत. मातृभाषेचे ज्ञान त्यांनी मिळविले ते इंग्लंडमधून परतल्यानंतरच. आयरिश भिक्षुणींनी दार्जिलिंग येथे चालविलेल्या 'लोरेटो' कॉन्व्हेंट स्कूलमध्ये, दोन्ही वडील बंधूंसह अरविंदांचेही नाव इ. स. 1877 साली घालण्यात आले. हिमालयातील रम्य निसर्गाच्या अंगाखांद्यावर त्यांनी व्यतीत केलेल्या या दोन वर्षांसंबंधी फारच थोडी माहिती मिळू शकते. सोनेरी फर्नमधून गेलेल्या रस्त्यांची आणि एकदोन छोट्या घटनांची आठवण श्री अरविंद अनेकदा काढीत. त्यांतली एक आठवण विद्यार्थ्यांच्या लांबच लांब शय्यागृहाशी निगडित झालेली आहे. त्यांचे बंधू मनमोहन यांची खाट अगदी दाराजवळ टाकलेली असे. आपल्याला आत घ्यावे यासाठी एका अपरात्री कोणीतरी दार ठोठावले. पण मनमोहनने उत्तर दिले, "मी नाही उघडू शकत. मी तर झोपलो आहे!" दुसरी घटना म्हणजे एक अर्थपूर्ण स्वप्न असून कालांतराने श्री अरविंदांनी तिचे वर्णन लिहून ठेवले आहे. "एक दिवस अंथरुणावर पडलेलो असताना माझ्या अंतरंगात शिरून माझ्यासकट उभ्या विश्वाला व्यापून टाकणारा अंधाराचा प्रचंड लोट मला एकाएकी दिसला. तेव्हापासून पुढे इंग्लंडमधील समग्र वास्तव्यात एक प्रकारचे तम मजवर घोंघावत राही. मला वाटते त्या अंधाराचा या तमाशी काही तरी लागाबांधा असावा. भारताकडील परतीची वाटचाल करू लागल्यानंतरच या तमाने मला सोडले."

2

# इंग्लंडमध्ये

*मँचेस्टर येथे 1879 ते 1884 सप्टेंबर (वय वर्षे 7 ते 12)*

1879 साली डॉ. कृष्णधन घोष आपल्या तीन्ही मुलांना घेऊन त्यांच्या शिक्षणासाठी इंग्लंडला गेले. डॉ. घोष ज्या रंगपुरात राहात असत, तेथील न्यायाधीश, श्री गलेझिया यांचे बंधू, रे. वुइल्यम ड्रूएट यांच्याकडे त्या मुलांना ठेवण्याची व्यवस्था झाली. श्री अरविंद रे. ड्रूएट यांजकडे पाच वर्षे राहिले. वुइल्यम ड्रूएट हे स्टॉकपोर्प रस्त्यावरील 'कॉंग्रिगेशनल' चर्चचे धर्माधिकारी होते. या चर्चला 'ऑक्टॅगॉनल (अष्टकोनी) चर्च' असेही म्हणत. त्या चर्चजवळच, शेक्सपीअर रस्त्यावर 84 क्रमांकाच्या घरात त्यांचे वास्तव्य असे. मँचेस्टरच्या ग्रामर स्कूलमध्ये श्री अरविंदांच्या दोन्ही मोठ्या भावांना प्रवेश मिळाला. परंतु अवघे सात वर्षांचे वय असलेल्या अरविंदाला मात्र ड्रूएट पतिपत्नी घरीच शिकवीत. श्री ड्रूएट हे एक निष्णात लॅटिन पंडित असून त्यांनी अरविंदाच्या इंग्रजी व लॅटिन भाषांच्या अध्ययनाचा पाया उत्तम प्रकारे घालून दिला. श्रीमती ड्रूएट त्याला इतिहास, भूगोल, गणित व फ्रेंच शिकवीत असत. सारे शिक्षण घरीच होत असल्यामुळे या छोट्या विद्यार्थ्याला स्वतःच्या आवडीचे ग्रंथ वाचायला भरपूर वेळ मिळे. या ग्रंथांत बायबल आणि शेक्सपीअर, शेले, कीट्स यांचे साहित्यही असे. इतक्या लहान वयात तो काव्य वाचीत असे एवढेच नव्हे, तर "फॉक्स फॅमिली" या नियतकालिकासाठी पद्यरचनाही करीत असे.

आपल्या मुलांचा कोणत्याही भारतीय व्यक्तीशी परिचय अथवा कोणत्याही प्रकारे भारतीय संस्कृतीशी संपर्क घडून येऊ नये अशा निकराच्या सूचना डॉ. घोष यांनी दिल्या होत्या आणि त्या शब्दशः पाळल्याही जात. तात्पर्य अरविंद मोठा झाला तो भारत देश, भारतीय लोक, भारताचा धर्म व भारतीय संस्कृती यांविषयी संपूर्णतया अंधारातच. त्यांचा सर्वांत धाकटा भाऊ, बारीन, याचा जन्म इंग्लंडमध्येच, क्रॉयडन येथे, दिनांक 5 जानेवारी 1880 ला झाला.

अरविंदांना बाटवून ख्रिस्ती केले गेल्याचा असत्य प्रवाद एके काळी प्रसृत झाला होता. त्यांनी स्वतःच सांगितलेली पुढील घटना कदाचित त्याला कारणीभूत झाली असेल.

"आम्ही इंग्लंडमध्ये असताना एकदा 'नॉन-कन्फॉर्मिस्ट' पाद्र्यांची बैठक भरली होती. आम्ही ज्यांच्या घरात राहात होतो त्या वृद्ध आजींनी श्री. ड्रूएट यांच्या मातोश्री श्रीमती ड्रूएट यांनी मलाही सभास्थानी नेले होते. बैठक आटोपताच जवळजवळ सारेच जण निघून गेले. पण काही विशेष श्रद्धाळू मंडळी तेवढी थोडा अधिक वेळ थांबली होती. आणि लोक बाटवले गेले ते याच अवधीत. मला तर अगदी कंटाळवाणे झाले होते. तेवढ्यात मजजवळ येऊन एका पाद्र्याने मला काही प्रश्न विचारले. मी काही उत्तरंच दिले नाही. मग 'तो बचावला, तो मुक्त झाला,' असा आरडाओरडा करून ते माझ्यासाठी प्रार्थना करू लागले, देवाचे आभार मानू लागले. नंतर ते पाद्री मजजवळ आले आणि मला प्रार्थना करण्यास सांगू लागले. मला तर प्रार्थना करण्याची सवयच नव्हती. पण झोपायला जाण्यापूर्वी लहान मुले जशी नुसती दिखाऊ प्रार्थना करतात त्याच थाटात मीही प्रार्थना केली! घडलं ते केवळ एवढेच. मी नेमाने चर्चमधे जातही नसे. आणि त्या प्रसंगी माझं वय होतं सारं दहा वर्षांचं."

श्री अरविंदांचे नाव सेंट पॉल विद्यालयात आणि केंब्रिज विद्यापीठात अरविंद ॲक्रॉइड घोष असे लावलेले होते. इंग्लंडला जाण्यापूर्वी डॉ. घोष भारतातच राहात होते तेव्हा अरविंदांच्या जन्मसंवत्सरी, 1872 मध्ये, कुमारी अनेट ॲक्रॉइड नावाच्या कोणी बाई कलकत्यास आलेल्या होत्या. त्यांचे मनमोहन घोष यांच्याशी सख्य असल्याने त्या नवजात बालकाच्या नामकरणाला उपस्थित होत्या. श्री अरविंदांच्या इंग्रजी रीतिभातींविषयी पराकाष्ठेची आवड बाळगणाऱ्या पिताजींना साहजिकच स्वतःच्या मुलाच्या नावात एखादे इंग्रजी नावही अंतर्भूत असावे असे वाटले आणि त्यांनी त्याला कुमारी ॲक्रॉइड यांचेच आडनाव बहाल केले. श्री अरविंदांनी मात्र कालांतराने ॲक्रॉइड या उपनावाचा त्याग केला.

एका नव्या सर्वव्यापी उत्थानाचे आणि महान क्रांतिकारी परिवर्तनाचे युग या जगात येऊ घातलेले असून त्याला आपण स्वतः हातभार-लावावा असे विधिलिखित असल्याची प्रबळ धारणा श्री अरविंदांच्या मनात वयाच्या सातव्या वर्षापासूनच दृढमूल झालेली होती.

*सप्टेंबर 1884 ते जुलै 1890 (वय वर्षे 12 ते 18)*

श्री अरविंद व त्यांचे वडील बंधू मनमोहन, यांना 1884 च्या सप्टेंबरमध्ये सेंट पॉल विद्यालयात प्रवेश मिळून ते दोघे लंडनला गेले. मुख्याध्यापक डॉ. वॉकर यांनी अरविंदाची चाचणी परीक्षा घेतली आणि त्याचे लॅटिनसकट सर्व विषयांतले प्रावीण्य पाहून ते इतके संतुष्ट झाले की अभ्यासातल्या त्याच्या प्रगतीकडे व्यक्तिशः लक्ष पुरवून त्यांनी ग्रीक भाषाही अरविंदाला स्वतःच शिकविली. ग्रीक, लॅटिन अभिजात साहित्याचा अभ्यास करून त्यांनी साहित्यविषयात बटरवर्थचे दुसरे आणि बेडफर्डचे इतिहासाचेही पारितोषिक पटकावले. आपल्या या छोट्या विद्यार्थ्याला विकास साधण्यासाठी पूर्ण संधी द्यावयाची

मुख्याध्यापकांचीच मनीषा असल्यामुळे अरविंदांची वरच्या वर्गांतील वाटचालही झपाट्याने पार पडली. श्री अरविंद सेंट पॉल विद्यालयातील साहित्य सभेच्या कामातही सक्रिय भाग घेत असत. दिनांक 5 नोव्हेंबर 1889 रोजी "स्विफ्टच्या राजनैतिक मतांतील विसंगती" या विषयावरील आणि 19 नोव्हेंबरला मिल्टनवरील वादविवादात भाग घेऊन त्यांनी असाधारण प्रावीण्य प्रकट केले होते.

सेंट पॉल विद्यालय ही (वसतिगृह नसलेली) नुसती दिवसाची शाळा होती. तिथल्या पहिल्या तीन वर्षांत श्री अरविंदांनी अभ्यासात फारच थोडा काळ वेचला, त्यात तर त्यांनी आधीच नैपुण्य मिळविलेले होते आणि म्हणून त्यावर अधिक काळ परिश्रम करण्याची आवश्यकता त्यांना भासत नव्हती. आपला बहुतेक वेळ ते अवांतर ग्रंथ, विशेषतः इंग्रजी काव्य, साहित्य आणि कल्पित कथा, फ्रेंच साहित्य, तसेच प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन युरोपचा इतिहास, वाचण्यात घालवीत, इटालियन जर्मन आणि थोडी स्पॅनिश या भाषा शिकण्यातही ते थोडा काळ व्यतीत करीत. काव्यरचनेत ते खूपच काळ घालवीत आणि लॉरेन्स बिन्यन यांनी त्यांच्या 'हेक्युबा' या काव्याचे कौतुकही केले असावेसे दिसते.

हे तिघे भाऊ लंडनमध्ये काही काळ श्री. ड्रूएट यांच्या मातोश्रीच्या सोबतीने राहात. परंतु धर्माच्या प्रश्नावर मनमोहनशी भांडण झाल्याने त्या निघून गेल्या. श्रीमती ड्रूट या वयाने वृद्ध असून कट्टर धर्मप्रचारक होत्या. सारे घरच डोक्यावर कोसळून पडण्याच्या भयापायी त्या नास्तिकाच्या संगतीत राहू इच्छित नव्हत्या. मग विनयभूषण व अरविंद असे दोघे दक्षिण केन्सिंग्टन लिबरल क्लबात एक खोली घेऊन राहू लागले. बंगालच्या उपराज्यपालपदी अल्पकाल विराजमान झालेले सर हेन्री कॉटन यांचे बंधू श्री. जे. एस्. कॉटन, हे या क्लबाचे कार्यवाह होते आणि विनय त्यांना त्यांच्या कामात सहाय्य करीत असे. पुढे मनमोहन भाड्याच्या घरात राहू लागला तेव्हा अरविंदांनी केंब्रिजला जाईपर्यंत तोच मार्ग अवलंबिला.

वडिलांच्या पैसे पाठविण्यात नियमितपणा नसल्यामुळे लंडनमधील शालेय जीवनात अरविंदांना फार हालअपेष्टा भोगाव्या लागल्या. सकाळी एक कपभर चहा आणि लोणी लावलेले पावाचे एकदोन काप आणि संध्याकाळी एक पेन्सचा पाव एवढ्या अन्नावरच एक पुरे वर्षभर त्यांना निर्वाह करावा लागला. श्री अरविंद स्वतःच्या बंधूसह ज्या घरमालकिणींकडे राहात त्यांतल्या दोघींच्या दयार्द्र अंतःकरणाची आठवण या अडचणींच्या संदर्भात ते नेहमी काढीतः 'आमची घरमालकीण म्हणजे एक देवदूतीच होती. ती मूळची समरसेटची. परंतु कदाचित वैधव्य आल्यानंतर असेल, ती लंडनलाच स्थायिक झाली होती. आम्ही महिनेन् महिने भाड्याचे पैसे दिले नाहीत तरी तिने कधी शब्दानेही विचारले नाही. अशा प्रकारे तिने किती तरी दिवस चालवून घेतले. ती कसे भागवीत असेल कोण जाणे! असल्या दोन घरमालकिणी आम्हाला लाभल्या. दुसरीही आमच्याशी फार चांगली वागे. तिचे देणे मी आय्.सी.एस. च्या शिष्यवृत्तीतून भागविले'.

*ऑक्टोबर 1890 ते ऑक्टोबर 1892 (वय वर्षे 18 ते 20)*

लंडनच्या सेंट पॉल विद्यालय ग्रीक व लॅटिन साहित्यातली उच्च श्रेणीची वार्षिक 80 पौंडांची शिष्यवृत्ती पटकावून, 1890 च्या ऑक्टोबर महिन्यात श्री अरविंद केंब्रिज येथील किंग्ज महाविद्यालयात प्रविष्ट झाले. एकाच वर्षात क्लासिकल ट्रायपॉसची परीक्षा पहिल्या वर्गात उत्तीर्ण होऊन ग्रीक व लॅटिन कवितेची सगळी पारितोषिके त्यांनी मिळविली. पदवी मात्र त्यांनी केंब्रिज विद्यापीठातून घेतली नाही. ते ट्रायपॉसच्या पहिल्या खंडात उच्च श्रेणीत (पहिल्या वर्गात) उत्तीर्ण झाले होते. आणि सामान्यतः या पहिल्या खंडात उत्तीर्ण झाल्यावरच बी.ए. ची पदवी दिली जाई. मात्र ती परीक्षा तिसऱ्या वर्षी दिलेली असावी लागे. अरविंदांना तर केवळ दोनच वर्षांचा अवधी लाभला होता आणि म्हणून ते दुसऱ्याच वर्षी उत्तीर्ण होऊन बसले होते. अशा परिस्थितीत पदवीला पात्र ठरण्यासाठी ट्रायपॉसच्या दुसऱ्या खंडाची परीक्षा विद्यार्थ्याला चौथ्या वर्षी द्यावी लागे. नाही तर पदवीसाठी अर्ज करणे हा ती मिळविण्याच्या दुसराच राजमार्ग. पण तो चोखाळण्याची श्री अरविंदांची इच्छा नव्हती. आणि प्राध्यापकाच्याच व्यवसायाचा अवलंब करायचा असेल तरच त्या पदवीचे महत्व.

शिष्यवृत्तीसाठी घेतलेल्या परीक्षेत ग्रीक व लॅटिन साहित्याच्या श्री अरविंदांच्या उत्तरपत्रिका विख्यात पंडित ओ.बी. (ऑस्कर ब्राउनिंग) यांनी तपासल्या होत्या. शेक्सपीअर व मिल्टन यांमधील साम्यभेद दाखविणारा निबंधही या पत्रिकांत आला होता. किंग्ज महाविद्यालयातल्या एका प्राध्यापकांच्या खोलीत कॉफी पीत असताना एक दिवस श्री अरविंदांची ऑस्कर ब्राउनिंग यांच्याशी गाठ पडली. नृत्यगीतांच्या विषयावरून शिष्यवृत्तीच्या प्रश्नाकडे वळून ओ.बी. महाशय त्यांना म्हणाले, "तुम्ही परीक्षेत असाधारण उच्च श्रेणी मिळवलीत, हे मला वाटते तुम्हाला माहीतच असेल. मी तेरा परीक्षांच्या उत्तरपत्रिका तपासलेल्या आहेत. पण या साऱ्या अवधीत तुमच्याइतकी उत्कृष्ट पत्रिका मला कधीच आढळली नव्हती. आणि तुमचा निबंध तर काय, अगदी विस्मयकारकच होता." नंतर, बहुधा नुसत्या जिज्ञासेनेच असेल, त्यांनी अरविंदांना "तुमचे निवासस्थान कोठे आहे?" हा प्रश्न विचारला. उत्तर ऐकून त्यांना धक्काच बसला. ते उद्गारले, "ते क्षुद्र बीळ!"

श्री अरविंदांचे वडील हे एक अत्यंत लोकप्रिय गृहस्थ होते. त्यांचे वास्तव्य रंगपूरला असताना कोणालाही काहीही करून घ्यायचे असेल तर ते एक डॉक्टरमहाशयांकडूनच साधे. रंगपूरचे इंग्रज न्यायाधीश श्री. ग्लेझियर हे त्यांचे निकटचे मित्र होते. पण ते बदलून गेले आणि त्यांच्या पदावर नियुक्त झालेल्या दुसऱ्या इंग्रजमहाशयांना डॉ. घोष यांचा हा जनमनावरील प्रभाव रुचला नाही. म्हणून त्यांनी त्यांची बदली करावी अशी सूचना शासनाला केली. त्यांचा सल्ला मानून शासनाने डॉक्टरमहाशयांची खुलन्यास नेमणूक केली. तेथेही डॉक्टरांना पराकाष्ठेची लोकप्रियता लाभली. परंतु ज्या परिस्थितीपायी

त्यांची बदली करण्यात आली होती तीमुळे त्यांच्या मनाला धक्का बसून इंग्रजांच्या न्यायबुद्धीवरची त्यांची श्रद्धा उडाली व त्यांना इंग्रजी वर्चस्वाचे उलट वैषम्यच वाटू लागले. जे जे म्हणून पाश्चात्य असे, ते ते सारेच त्यांना आजवर चांगले वाटत आले होते. आपली मुलेही यशस्वी व्हावी हीच खरोखर त्यांची सर्वोच्च महत्वाकांक्षा होती आणि भारतीय असैनिक (मुलकी) सेवेसाठी स्वीकारले जाणे हा तर त्या काळी यशाचा परमोच्च बिंदूच मानला जाई.

1880 साली श्री अरविंद भारतीय असैनिक (मुलकी) सेवेच्या (आय.सी.एस्.) खुल्या स्पर्धेत उत्तीर्ण झाले. पुढे दोन्ही कालक्रमागत परीक्षांत आणि वैद्यकीय परीक्षेतही त्यांनी यश मिळविले. तसे आय.सी.एस्. चे आकर्षण त्यांना वाटत नव्हतेच. पण तो सन्मान पटकावण्याची एकही संधी आपल्या कुटुंबातील मंडळी आपल्याला गमावू देणार नाहीत हेही ते जाणून होते. आणि असैनिक (मुलकी) अधिकाऱ्यांच्या वर्गात समाविष्ट होण्याच्या दृष्टीने घोड्यावर बसण्याच्या चाचणीतच तेवढे यश मिळवायचे राहिले होते. पण त्या चाचणीला उपस्थितच न राहण्याच्या सोप्या उपायाच्या बळावर स्वतःला असैनिक (मुलकी) चाकरीसाठी अपात्र ठरवून घेण्याचा डाव अरविंदांनी जिंकला. या संदर्भात एक गोष्ट अवश्य सांगायला हवी. घोड्यावर बसण्याच्या चाचणीत उत्तीर्ण न झालेल्यानाही आय.सी.एस्. मध्ये घेतल्याची आणि प्रत्यक्ष चाकरीच्या कालावधीतच त्यांनी त्या चाचणीत यश मिळविल्याची उदाहरणेही काही थोडी थोडकी नव्हती. पण अरविंदांना मात्र अपात्र ठरविण्यात आले आणि त्यांनाही त्यातच समाधान लाभले. असैनिक (मुलकी) सेवा आयोगाने पुढील टिप्पणी केली: "घोड्यावर बसण्याच्या चाचणीला उपस्थित राहाण्यासाठी श्री अरविंद घोष यांना कित्येकदा वेळ नेमून दिली होती. पण ठरलेल्या वेळी उपस्थित होण्याचे त्यांनी पुनःपुन्हा चुकविलेच. अर्थातच आय.सी.एस. मध्ये नियुक्त होण्याजोगी पात्रता त्यांनी मिळविली आहे असे प्रशस्तिपत्र आम्ही त्यांना देऊ शकत नाही." आय.सी.एस. साठी अरविंदांना अपात्र ठरविण्याच्या या डावपेचांची दुसरी बाजू त्यावेळचे भारतमंत्री लॉर्ड किंबर्ले यांनी त्यांच्याविषयीच्या व्यक्तिपुस्तिकेतील (फाइलमध्ये) लिहिलेल्या टीपेत दृष्टीस पडते. भारतमंत्री श्री अरविंदांची राष्ट्रवादी मते जाणून होते असे दिसते. त्यांची टीप अशी: "आय.सी.एस.ला श्री अरविंदांची जोड देणे इष्ट ठरेल की नाही याविषयी मला खूपच शंका आहे." इकडे श्री अरविंदानाही आय.सी.एस. ची फारशी गोडी नसल्यामुळे जे घडले त्याने उभयपक्षी समाधानच लाभले.

भारतातील ब्रिटिश शासनाच्या पाषाणहृदयी धोरणाविरुद्ध गाऱ्हाणी सांगणारी पत्रे डॉ. घोषांनी आपल्या इंग्लंडमधील मुलांना लिहिली होतीच ते त्यांना वेळोवेळी भारतीय वृत्तपत्रांतील कात्रणेही पाठवीत असत. त्यांतील नानाविध वृत्तान्तामुळे अरविंदांच्या मनात, विदेशी शासनाने भारतावर लादलेल्या पारतंत्र्याविरुद्ध रोषाची भावना उत्पन्न झाली होती. पण स्वदेशाच्या मुक्तीसाठी प्रत्यक्ष चळवळीत भाग घेण्याचा निर्धार मात्र

काही वर्षांनंतरच आकारास आला. केंब्रिज येथे असताना 'इंडियन मजलिसचे' एक सदस्य (पुढे ते या संस्थेचे कार्यवाहही झाले होते) या नात्याने अरविंदांनी काही क्रांतिवादी भाषणे केली होती. त्यांचे पर्यवसान इंग्रजी राज्यकर्त्यांचा कल श्री अरविंदांना आय.सी. एस्. मधून वगळण्याकडे झुकण्यात झाले असणार.

भारतीय राजकारणाचे एक मवाळ पुढारी, श्री. दादाभाई नौरोजी यांच्या नेतृत्वाबिरुद्ध सतत बंड उभारणाऱ्या लंडनवासी भारतीयांच्या एका छोट्या गटाचे अरविद व त्यांचे बंधू विनय हे दोघे घटक होते. इंग्लंडमधील वास्तव्याच्या सरत्या दिवसांत लंडनवासी भारतीयांच्या एका अप्रकट बैठकीलाही अरविंद उपस्थित होते. या बैठकीत 'कमळ व कट्यार' या रम्याद्‌भुत नावाचे एक गुप्त मंडळ स्थापन करण्यात आले. मायभूमीवरील परकी शासन उखडून टाकण्यासाठी काही तरी उपाय योजण्याची शपथ या मंडळाच्या प्रत्येक सदस्याने घेतली होती. हे मंडळ अल्पजीवी ठरले असले, तरी त्याच्या सदस्यांतल्या काहींनी स्वतः घेतलेली शपथ मात्र पुरी केली. अशा सदस्यांतलेच अरविंद हे एक.

श्री अरविंदाना आय.सी.एस. साठी अपात्र ठरविण्यात आले त्या वेळी बडोद्याचे गायकवाड महाराज लंडनमध्ये होते. त्यांच्याशी सर हेन्री कॉटन यांच्या बंधूंनी श्री अरविंदांचा परिचय करून दिला. परिणामी त्यांना गायकवाड महाराजांच्या संस्थानात नेमणूक मिळाली. या नेमणुकीवर उपस्थित होण्यासाठी भारतात परतावे या उद्‌देशाने त्यांनी 1893 च्या जानेवारीत इंग्लंडचा निरोप घेतला.

अशाप्रकारे आपल्या आयुष्याची सर्वांत संस्कारक्षम वर्षे अरविंदांनी आधी दार्जिलिंगच्या कॉन्व्हेंट स्कूलमध्ये आणि पुढे इंग्लंडमध्ये, पाश्चात्य संस्कृतीच्याच प्रभावाखाली व्यतीत केली. एकवीस वर्षाच्या वयाला ते मायदेशी परतले, तेव्हा भारतीय स्वातंत्र्युद्धाची संघटना त्यांच्याच हातून व्हावी आणि त्यांनीच भारतीयांना स्वतःच्या महान संस्कृतीची आणि भारताच्या जगातील महत्त्वाच्या स्थानाची जाणीव करून द्यावी अशी विधात्याची योजना होती.

इंग्लंडमधल्या चौदा वर्षाच्या वास्तव्यानंतर स्वाभाविकच अरविंदांना इंग्रजी संस्कृती व रीतीभाती यांविषयी जिव्हाळा वाटू लागला असणार, अशीच एखाद्याची समजूत होईलच पण या संदर्भात त्यांचे स्वतः चे वक्तव्य असे होतेः "आणखी एक राष्ट्र या नात्याने एखाद्या युरोपीय देशाविषयी मला बौद्धिक व भावनिक जिव्हाळा वाटलाच असला, तर तो कधीच न पाहिलेल्या किंवा वास्तव्यही न केलेल्या फ्रान्सविषयी; इंग्लंडविषयी नव्हे!"

इकडे भारतात डॉ. कृष्णधन घोष आपल्या मुलांच्या परत येण्याची मोठ्या उत्कंठेने प्रतीक्षा करीत होते. परंतु ती शुभ घटना पाहायला ते जगले मात्र नाहीत. अरविंदांनी ज्या बोटीतून इंग्लंड सोडले ती पोर्तुगालच्या सागरतीराजवळ बुडल्याचे त्यांना चुकीने

कळविण्यात आले. हे वृत्त कानी येताच आपला मुलगाही बुडला असणार अशी अटकळ डॉ. घोषांनी बांधली. त्या वत्सल पित्याला हा भयानक धक्का असह्य ठरला आणि हृदयविकाराच्या आकस्मिक झटक्याने त्यांचा अंत झाला. आगबोट बुडल्याचे वृत्त खरेच होते; पण श्री अरविंद त्या बोटीवर नव्हते. त्यांनी कर्थेज या डाकवाहू बोटीतूनच इंग्लंड सोडले होते. याही बोटीला वाटेत भीषण वादळाशी झुंज द्यावी लागली. पण 1893 च्या फेब्रुवारीच्या आरंभीच ते भारतापर्यंत सुखरूप पोहोचून मुंबई बंदराच्या धक्क्याला लागले होते.

मुंबईतील अपोलो बंदरात श्री अरविंदांनी भारतीय भूमीवर पाऊल टाकले आणि भारतमातेने त्यांचे स्वागत अत्यंत संस्मरणीय पद्धतीने केले. त्यांनी लिहून ठेवले आहेः "एक प्रकारची विशाल शांती माझ्या मनात अवतीर्ण झाली, तिने मला वेढून घेतले आणि तिचे सान्निध्य मला पुढेही कित्येक महिने लाभले." आपल्या शिष्यांतल्या एकाला त्यांनी पुढील शब्दांत कळविलेः "मुंबईच्या अपोलो बंदरावरील भारतीय भूमीवर पाऊल ठेवल्यापासूनच मला आध्यात्मिक अनुभव येऊ लागले. पण ते इहलोकाशी निगडित नव्हते असे मात्र नव्हे. अनंताने भौतिक अवकाशाला व्यापून टाकावे, किंवा पार्थिव वस्तू वा देह यांत सर्वांतर्यामी वसणाऱ्या परमात्म्याचे वास्तव्य असावे तशा प्रकारचा तो संबंध होता. त्या बरोबरच मला असे जाणवले की माझा जगाच्या अतिभौतिक स्तरांत प्रवेश होऊन त्या स्तरांचे प्रभाव व परिणाम भौतिक पातळीवरही घडून येत आहेत."

3

# बडोद्यास

श्री अरविंद दि. 8 फेब्रुवारी 1893 ला बडोदे संस्थानच्या चाकरीत गेले. तांत्रिक दृष्ट्या ते 18 जून 1907 पर्यंत बडोदे संस्थानच्या चाकरीत होते. पण 1906 च्या फेब्रुवारीपासून एप्रिलपर्यंत आणि फिरून 12 जून 1906 पासून 12 जुलै 1907 पर्यंत सुट्टीवर राहून त्यांनी राजकीय कार्यात लक्ष घातले. प्रारंभी ते भूमिमापन-निर्धारण (सर्व्हे) विभागात काम करू लागले होते. पुढे त्यांची नेमणुक मुद्रा व राजस्व विभागात करण्यात आली. बडोदे संस्थानच्या सचिवालयातही ते काही दिवस काम पाहात.

बडोद्याचे महाराज स्वतःच्या वैयक्तिक कामांतही त्यांचा उपयोग करून घेत. उदा. महत्त्वाच्या पत्रांच्या कच्च्या प्रती तयार करणे, पत्रव्यवहाराच्या आणि कागदपत्रांचा सारांश काढणे, किंवा स्वीकृतिपत्रे सिद्ध करणे इत्यादी. परंतु त्यांना काही काळ महाराजांसह काश्मीरला जावे लागले होते; तेवढा प्रसंग वगळता ते महाराजांचे वैयक्तिक कार्यवाह मात्र कधीच नव्हते. एकदा तर श्री. बापट यांच्या प्रकरणाचा व त्यावरील न्यायालयीन मताचा सारांश तयार करण्यासाठी त्यांना हेतुपूर्वक उटीसही धाडले होते.

प्रख्यात इतिहासकार रा. ग. स. सरदेसाई यांनी 'सयाजीराव गायकवाड यांच्या सहवासात' या आपल्या ग्रंथात श्री अरविंदाशी निगडित असलेल्या काही घटना निवेदन केल्या आहेतः "किती तरी वेळा मी व श्री अरविंद सयाजीरावांच्या सान्निध्यात एकत्र येत असू. कधी कधी त्यांची भाषणे श्री अरविंदांसारखी माणसेच लिहून देत. एकदा महाराजांना एका सामाजिक परिषदेपुढे व्याख्यान द्यावयाचे होते. ते व्याख्यान श्री. अरविंदांनी लिहून दिले. आम्ही तिघांनी (महाराज, सरदेसाई व श्री अरविंद) एकत्र बसून ते वाचले. ते ऐकल्यावर महाराज म्हणाले, "अरविंदबाबू, तुम्ही हे भाषण थोड्या सामान्य प्रतीचे नाही का बनवू शकणार? ते इतके उत्कृष्ट उतरले आहे की त्याला कोणीच माझे भाषण मानणार नाही." स्मित करीत श्री अरविंद उत्तरले, "व्यर्थ बदल कशासाठी करायचा? ते काहीसे सामान्य प्रतीचे केल्यामुळे लोक ते आपलेच असल्याचे मानतील, असं का वाटतं, महाराज, आपल्याला? बरीवाईट कशीही होवोत, लोक नेहमी असंच मानणार की महाराज स्वतःची भाषणं दुसऱ्यांकडून लिहून घेतात, त्यातले विचार आपले आहेत की नाही ही खरी महत्त्वाची गोष्ट, तोच तर त्यातला तुमचा स्वतःचा असा

महत्त्वाचा घटक." भारताचे व्हाइसरॉय आणि बडोदे संस्थान यांच्याविषयी बडोदे संस्थान व भारतीय शासन यांच्यांत झालेल्या पत्रव्यवहाराचा बराचसा भागही अरविंदांनीच तयार केलेला असल्याचेही सरदेसाई सांगतात. लॉर्ड कर्झन हे बडोद्याला भेट देतील अशी अपेक्षा असल्याचे महाराज पॅरिसमध्ये असताना त्याना कळवून भारतीय शासनाने त्यांना परत येण्याविषयी बजावले होते असे दिसते. पण त्यांचे परत येणे घडले नाही आणि लॉर्ड कर्झन यांना तो अपमान वाटला. श्री. सरदेसाई असेही लिहितात की, "त्या काळी मी व श्री अरविंद बरोबरच फिरावयास जात असू. त्यांचा स्वभाव सामान्यतः संकोची व अबोल असे. प्रश्नाला ते 'होय' किंवा 'नाही' एवढेच उत्तर देत, त्यापलीकडे नाही. त्यांच्या ठायी साक्षात्कारी संताची काही लक्षणे वसत होती."

श्री अरविंदांना राजकारणाविषयी प्रमाणाबाहेर आस्था नव्हतीच. झटपट आणि यशस्वीपणे काम उरकण्याची त्यांची क्षमता वाखणताना दुसरीकडे त्यांना नियमित आणि कामसू बनण्याचीही सूचना महाराजांनी केली होती. 1900 मध्ये बडोदा महाविद्यालयाच्या प्राध्यापक पदी त्यांची नेमणूक झाली. 1909 मधे ते भूपालचंद्र बसू यांची कन्या मृणालिनी हिच्याशी विवाहबद्ध झाले. तात्पुरत्या योजनेनुसार बडोदे महाविद्यालयात फ्रेंचचे अध्यापन करण्याचीहो विनंती त्यांना करण्यात आली होती. स्वतःच्या राजकीय कार्याला गती देण्यासाठी त्यांनी 1903 मध्ये एक महिन्याची सुट्टी घेतली. परंतु यामुळे होणारी विद्यार्थ्यांच्या अभ्यासाची हानी भरून काढण्याच्या दृष्टीने त्यांनी जाण्यापूर्वी स्वतःच्या घरी फ्रेंचचे जादा वर्ग घेतले. 1904 मध्ये त्यांना महाविद्यालयाचे उपप्राचार्य नेमण्यात आले. श्री अरविंद एका व्याख्यानात स्वतःच्या प्राध्यापकीय जीवनाविषयी म्हणाले, "मी मनमोहन यांच्यासारखा निष्ठावंत प्राध्यापक नव्हे. टिपण्यांकडे मी कधीच पाहात नसे. व कधी कधी माझे स्पष्टीकरण टिप्पणीशी मुळीच जुळतही नसे. मी इंग्रजीचे व अधून मधून फ्रेंचचेही अध्यापन केले. विद्यार्थी समग्र व्याख्यान शब्दशः उतरवून घेत आणि तोंडपाठ करीत याचे मला आश्चर्य वाटे. इंग्लंडमध्ये अशी गोष्ट कधीच घडली नसती. बडोद्यातील विद्यार्थी माझ्या टिप्पणीच्या भरीला मुंबईच्याही एखाद्या प्राध्यापकांच्या-विशेषतः ते परीक्षक नेमले जाणार असतील तर-टिप्पण्या पण आणवीत असत. एकदा मी सौदीच्या नेल्सनचरित्रावर व्याख्यान देत होतो. पण माझे व्याख्यान टिप्पण्यांशी अगदीच जुळेना. अर्थात विद्यार्थी उद्गारले, 'टिप्पणीत जे काही आढळते त्यासारखे तर हे मुळीच नाही!' मी उत्तरलो, "मी टिप्पण्या वाचलेल्या नाहीत. त्या कशाही असल्या तरी अगदीच टाकाऊ असतात."

असे असूनही विद्यार्थी त्यांच्याविषयी महान आदर बाळगीत असत. त्यांचे एक विद्यार्थी कन्हैयालाल मुनशी, हे आपल्या आठवणीत म्हणतात, "माझा श्री अरविंदांशी इ. स. 1902 इतक्या पूर्वीपासून परिचय आहे. मॅट्रिक परीक्षेत उत्तीर्ण होऊन त्या वेळी मी बडोदा महाविद्यालयात नाव घातले होते. त्यांच्या व्यक्तिगत संपर्काचा लाभ तत्पूर्वीही

एखाद्या प्रसंगी मला झालेला असला, तरी माझे मन पूज्यभावाने परिपूर्ण झाले ते महाविद्यालयातील श्री अरविंदविषयक आख्यायिकेमुळेच. जेव्हा जेव्हा ते महाविद्यालयात इंग्रजीचे प्राध्यापक म्हणून येत तेव्हा तेव्हा त्यांचे शब्द मी आदराने मनात घोळवीत असे."

श्री अरविंदांनी बडोद्यात संस्कृत, मराठी, गुजराती व बंगाली या भाषांच्या अध्ययनात अधिक लक्ष घातले. मधुसूदन व बंकिमचंद्र यांची काव्ये मूळ बंगालीतच समजून घेऊन त्यांचा रसास्वाद घेण्याची क्षमता त्यांनी लवकरच प्राप्त करून घेतली. उपनिषदे, गीता, रामायण, महाभारत व कालिदास, भवभूती इत्यादि कवींचे ग्रंथही त्यांनी अभ्यासिले. भारतीय संस्कृती व जीवनपद्धती यांविषयी नैसर्गिक आकर्षण आणि जे जे म्हणून भारतीय असेल त्या साऱ्याविषयी स्वभावसिद्ध अत्यादर व जिव्हाळा यांमुळेच हे घडून आले. वैद्यनाथास जाऊन काही काळ आपल्या नातलगांच्या सहवासात व्यतीत करण्याची त्यांची पद्धत असे. त्या प्रवासातही त्यांच्या पेट्या पुस्तकांनी भरलेल्या असत. त्यांच्या एक भगिनी; वासंतीदेवी, यांनी त्या भेटीचे वर्णन केले आहेः 'अरुदादा नेहमीच दोन तीन पेट्या घेऊन येत असे. आम्हाला वाटायचे की त्यांत मूल्यवान कपड्यांचे जोड आणि सुवासिक अत्तरांसारख्या इतर चैनीच्या वस्तू असतील. त्यांनी पेट्या उघडल्या की मी त्यांत डोकवायची आणि, अहो आश्चर्यम्! हे काय? काही थोडे साधेसुधे कपडे आणि बाकी सगळी पुस्तके. पुस्तकांविना दुसरे काहीदेखील नाही. अरुदादांना ही सगळीच वाचायला आवडत असतील का? आम्हा साऱ्यांना सुट्टीत आनंद लुटायला आणि गप्पा छाटायला हवे असते. हासुद्धा काळ तो दादा ही पुस्तके वाचण्यातच घालवू इच्छितो की काय? पण त्याला वाचनाची आवड होती आणि म्हणूनच तो स्वतः बरोबर पुस्तके आणीत असे. तो संभाषणात, गप्पाष्टकांत आणि आमोदप्रमोदात सहभागी होत नसे असे मात्र नाही. त्याचे बोलणे कोट्या आणि विनोद यांनी भरलेले असे'.

श्री अरविंद अत्यंत हावरेपणाने वाचीत असत. अभिरुचीचे व्यापक क्षेत्र पादाक्रांत करणारी पुस्तके हाती येताक्षणीच ते ती वाचण्यात दंग होऊन जात. सर्व नवीनतम ग्रंथांच्या सूची डाकेने पाठविण्याची नित्याची सूचना त्यांनी मुंबईतल्या दोन ग्रंथागारांना देऊन ठेवली होती. त्यांच्याकडे एकसारखी पुस्तकांची खोकी येतच राहात आणि ती बघून त्यांची मित्र मंडळी अगदी थक्क होऊन जात. या पुस्तकांच्या किमती देता याव्यात म्हणून आपल्या मासिक वेतनाचा काही भाग ते निराळा राखून ठेवीत असत. रॉकेलच्या दिव्याजवळ बसून ते रात्री उशिरापर्यन्त वाचीत असत. मग डासांच्या थव्याकडेही त्यांचे लक्ष नसे. आणि टेबलावर वाट पाहणाऱ्या जेवणाचेपण त्यांना कित्येकदा भान राहात नसे. सकाळी न्याहरी होताच ते फिरून वाचनात किंवा लेखनात मग्न होत ते थेट स्नानाची, भोजनाची किंवा कामाची वेळ होईपर्यंत. अन्न वस्त्र, व अन्य क्षेत्रासंबंधीच्या त्यांच्या मूलभूत जीवनविषयक दृष्टिकोनावर इंग्लंडमधील प्रदीर्घ वास्तव्याचा थोडादेखील विपरीत परिणाम झालेला नव्हता. उलट तो दृष्टिकोन उत्तरोत्तर अधिकच ठळकपणाने जाणवू

लागला होता. प्रत्येक गोष्टीत ते अगदी साधे असत. इतके की कधी कधी तो साधेपणा त्रासदायकही वाटायचा. गळक्या छपराखाली किंवा गादी नसलेल्या करकरणाऱ्या पलंगावर ते अगदी आरामात बसत. त्यांचे वाचन सर्वसमावेशक अभिरुचीचे असे. होमर, दान्ते आणि होरेस यांची काव्येही ते संस्कृत कवीइतक्याच हावरेपणाने वाचीत असत.

श्री अरविंदांच्या कवितांचा एक संग्रह 'मर्टिलीप्रत गीते (साँग्ज टु मर्टिली) व अन्य कविता' या नावाने 1895 मध्ये प्रसिद्ध झाला होता. त्यातल्या काही रचनांवर युरोपीय संस्कृतीची व वातावरणाची छाप दिसते. तर त्यांतल्याच इतर काही कवितांत भारत व भारतीय संस्कृती यांसंबंधी त्यांची प्रारंभीची प्रतिक्रिया वर्णिलेली आढळते. 'उर्वशी' आणि 'प्रेम व मृत्यू' ही काहीशी प्रदीर्घ काव्ये बडोद्यात रचलेली आहेत. 'सावित्री' या त्यांच्या श्रेष्ठ महाकाव्याची पहिली प्रकल्पनादेखील याच काळातली.

दिनेंद्रकुमार राय या तरुण बंगाली साहित्यिकाने 1899 मध्ये श्री अरविंदांना बंगाली भाषेतील प्रावीण्य व संभाषणकलेतील नैपुण्य विकसित करून घेण्यासाठी सहाय्य केले. उलट त्यानेही श्री अरविंदांजवळ फ्रेंच आणि जर्मन शिकण्याची खटखट केली. जवळ जवळ दोन वर्षे ते एकत्र होते. 'श्री अरविंदो प्रसंगे' या आपल्या पुस्तकात, श्री अरविंदांच्या बडोद्यातील जीवनाचे उज्जवल शब्दचित्र दिनेंद्रकुमारांनी रेखाटले आहेः 'रात्रंदिवस मी त्यांच्या सान्निध्यात असे. त्यांच्या अंतरंगाचा जसजसा अधिक परिचय होत गेला तसतशी ते या पार्थिव सृष्टीतले नसल्याची अधिकाधिक जाणीव मला होऊ लगाली. ते म्हणजे कसल्या तरी शापापायी आपल्या स्वर्गातील निवासस्थानातून भ्रष्ट झालेले कोणी देवच होते.'

'स्वराज्य' हे भारतीय राष्ट्रवादी चळवळीचे ब्रीदवाक्य आणि तिचे उद्दिष्टही होते. श्री अरविंदही तो शब्द वापरीत असत. पण त्यांच्या त्या शब्दाला राजकीय अर्थासारखाच आध्यात्मिक आशयही लाभत असे. हा शब्द पूर्ण राजकीय स्वातंत्र्य या अर्थी, बंगालमध्ये दीर्घकाल स्थायिक झालेल्या देऊसकर नावाच्या एका सिद्धहस्त महाराष्ट्रीय लेखकाने, 'दाशेर कथा' या आपल्या पुस्तकात पहिल्या प्रथम वापरला होता. ज्या ब्रिटिश लोकांच्या आणि त्यांनी चालविलेल्या भारताची औद्योगिक लूट यांच्यापायी हा भारत देश आणि येथील प्रजा दरिद्री होऊन बसली, त्यांच्याविषयी सांगोपांग आणि जिवंत विवेचन या पुस्तकात केलेले आहे. या पुस्तकामुळे बंगालमध्ये अमाप प्रक्षोभ उसळला. तरुण बंगाल्यांच्या मनाची पकड घेऊन स्वदेशी चळवळीची सिद्धता करण्यास या पुस्तकाने, इतर कोणत्याही गोष्टींहून अधिक हातभार लावला. नेहमीप्रमाणे धास्तावून जाऊन शासनाने या पुस्तकावर बंदी घातली. स्वराज्य शब्द आध्यात्मिक अर्थी जुन्या धर्मग्रंथातूनही आढळतो हेही येथे निर्दिष्ट करायला हवे. आध्यात्मिक व राजकीय अशा दोनही अर्थांनी श्री अरविंदांनी स्वराज्याचा पुरस्कार केला. 'बंदे मातरम्' पत्रिकेत 2 मार्च 1908 रोजी त्यांनी लिहिले होते, 'भारत हा सर्व राष्ट्रांचा गुरू असून मानवी आत्माच्या

गहनतर व्यथांची चिकित्सा करणारा तो धन्वंतरी आहे. जागतिक जीवनाला नवा आकार देण्याचे कार्य पुन्हा एकदा विधात्याने भारताकडे सोपविले आहे. परंतु स्वराज्य मिळविणे ही या कार्याची एक अत्यावश्यक निकड असून भारताने ती पूर्ण करायलाच हवी."

श्री अरविंदांच्या राजकीय विचारसरणीला व चळवळीला तीन बाजू होत्याः

(अ) सशस्त्र बंडाची सिद्धता करण्याच्या प्रमुख हेतूने गुप्तपणे क्रांतीचा प्रचार व संघटना करणे, हेच कार्य त्यांनी प्रथम हाती घेतले.

(ब) समग्र राष्ट्राला स्वातंत्र्यध्येयोन्मुख करणाच्या उद्देशाने सार्वजनिक प्रचार करणे. त्यांनी राजकारणात पदार्पण केले त्या वेळी बहुसंख्य भारतीयांना हे ध्येय अव्यवहार्य व अशक्य —जवळजवळ मूर्खाचे स्वप्नरंजनच —वाटत असे. त्यांना वाटे, "ब्रिटिश साम्राज्य अत्यंत बलाढ्य आहे. संपूर्णपणे निःशस्त्र आणि निःसत्व बनवून टाकलेला भारत त्या मानाते इतका दुर्बल आहे की अशा प्रकारच्या खटाटोपात त्याला यश लाभणे स्वप्नातदेखील शक्य नाही."

(क) वाढता असहकार आणि निःशस्त्र प्रतिकार या मार्गांनी विदेशी शासन उखडून टाकता यावे म्हणून एकजुटीने आणि उघडपणे विरोध चालू ठेवण्यासाठी जनतेची संघटना उभारणे.

श्री अरविंद पाँडिचरीस गेल्यानंतरदेखील, त्यांनी आखून दिलेल्या चाकोरीतूनच भारतीय स्वराज्याचे आंदोलन अगदी स्वातंत्र्य प्राप्त होईपर्यंत प्रगती करीत गेले.

इंग्लंडहून परतल्यावर सहा महिन्यांनी, म्हणजे 1893 च्या ऑगस्टमधे श्री अरविंदांनी मुंबईच्या 'इंदुप्रकाश' साप्ताहिकात एक लेखमाला लिहिली. 'जुने दिवे देऊन नवे' असे तिचे शीर्षक होते. राष्ट्रवादी चळवळीसंबंधी स्वतःच्या मतांचे त्यांनी केलेले हे पहिले प्रकट निवेदन होय. एकवीस वर्षे वयाच्या श्री अरविंदांचा परिचय त्या साप्ताहिकाचे संपादक श्री. के.जी. देशपांडे यांनी पुढील शब्दांत करून दिला होता. "आजच्या काळाचे निरीक्षण अत्यंत समर्थपणे आणि विचक्षणतेने करणाऱ्या एका लेखकाची सध्याच्या राजकीय प्रगतीवरील लेखमाला प्रसिद्ध करण्याचे अभिवचन काही काळापूर्वी आम्ही आमच्या वाचकांना दिले होते. त्या लेखमालेचा पहिला हप्ता वाचकांच्या हातात देताना आम्हाला अत्यंत आनंद होत आहे. ही मते ज्या शीर्षकाखाली प्रसिद्ध होत आहेत ते 'जुने दिवे देऊन नवे' हे शीर्षक रूपकात्मक असले तरी सूचक आहे. लेखमालेची प्रस्तावना पुढल्या अंकातही चालू राहील. या मालेत समाविष्ट असलेली मते आणि आपल्याकडील राजनीतिनिपुणांनी सर्वसाधारणपणे स्वीकारलेली मते एक नव्हेत आणि याच कारणामुळे प्रस्तुत मते अत्यंत महत्वाची ठरतात. आपण राजकीय प्रगतीसाठी चालवलेले प्रयत्न सततचे नसून त्यांत आवेशाचीही वाण आहे, असे या मालेत आपल्या निदर्शनास आणून दिले आहे. आपल्या राजकीय चळवळीला ग्रासून टाकणारा दोष, ढोंग, हाच असून तिरपागडा दृष्टिकोण हीच लोकांची आवडती प्रवृत्ती आहे. खऱ्या-खुऱ्या व

प्रामाणिक टीकेची अत्यंत निकड आहे. आपल्या संघटनांचा पायाच भक्कम नसल्याने त्या कोणत्याही क्षणी कोसळण्याचे भय आहे. अशा परिस्थितीत राजकीय प्रगतीकडे वळविलेली आपली सारी शक्ती चुकीच्या दिशेने, वेचली जात असताना गप्प बसणे म्हणजे नुसती निष्क्रियताच नव्हे तर अपराध ठरणार आहे. वादविषय बनलेले प्रश्न अवाढव्य आहेत. किंबहुना राष्ट्राची उभारणी करावयाची का त्याला कोसळू द्यायचे हाच मूळ प्रश्न आहे. आणि म्हणूनच मोठी व्यक्तिगत अडचण आणि संभाव्य हेतुविपर्यासाचा धोका पतकरूनही महान साहित्यिक प्रतिभा, उदात्त संस्कार आणि पुष्कळसा अनुभव यांची जोड लाभलेली आणि लेखनाच्या कलेत सिद्धहस्त असलेली व्यक्ती आपली मते ठाम भाषेत आणि निवडक शब्दांत— व असेही म्हणण्यास प्रत्यवाय नाही की स्वतःच्या वैशिष्ट्यपूर्ण शैलीत—व्यक्त करण्यासाठी आम्ही शोधून काढली आहे. वाचकांनी प्रस्तुत लेखमाला अत्यंत काळजीपूर्वक आणि सातत्याने वाचावी अशी विनंती आम्ही करीत आहोतः त्यांना विचार करायला लावणारी आणि त्यांच्या राष्ट्रप्रेमी आत्म्यांना हेलावून टाकणारी सामग्री या लेखांत त्यांना आढळेल असे आश्वासनही आम्ही देत आहोत.''

वरील लेखमालेचा प्रारंभ दिनांक 9 ऑगस्ट 1893 ला झाला. तिने उभ्या देशाला प्रक्षुब्ध केले, हेलावून टाकले. ती 1894 च्या फेब्रुवारीपर्यंत प्रसिद्ध होत होती. तिच्यातले काही उतारे पुढे देत आहोत.

"मला काँग्रेसविषयी असे म्हणावेसे वाटते की तिची ध्येये चुकली असून ती पूर्ण करण्यासाठी तिने चालविलेली वाटचाल ही कळकळीची आणि पूर्ण हार्दिक नाही. तसेच तिने निवडलेल्या पद्धतीही सुयोग्य नाहीत आणि ज्यांच्यावर तिने विश्वास टाकला आहे त्या व्यक्तीही पुढारी होण्याच्या योग्यतेच्या नाहीत. थोडक्यात सांगायचे तर 'अंधेनेव' नसले तरी, कमीत कमी, 'एकाक्षेनेव नीयमानाः यथांधाः' अशीच तिची गत आज झालेली आहे.

कारण चिंतन किंवा सहजप्रवृत्ती यांच्या साहाय्याने स्वतःच्या अवस्थेचे सुस्पष्ट ज्ञान प्राप्त करणे आणि मग त्याचा कौशल्याने अधिकात अधिक लाभ करून घेणे यातच राजकारणाचे समग्र रहस्य सामावलेले असून आपण नेमके हेच करायला चुकत आहोत.

निष्ठा म्हणजेच शक्ती आणि तिचीच आपल्यात वाण आहे!

दुर्बळ व निःसत्व बनलेल्या राष्ट्रीय अस्मितेचे पुनरुज्जीवन करण्याचे कार्य अगदी सर्वोत्कृष्ट अशा यंत्रणेच्यादेखील आवाक्याबाहेरचे कसे असते आणि म्हणूनच बाह्य कर्तृत्वाच्या बळावर विसंबून न राहता अंतरंगातूनच प्रारंभ करण्याची किती मोठी आणि स्पष्ट निकड आहे याची जाणीव वरील वृत्ती टिकून असेतो आपल्याला होणारच नाही.

आपल्याकडचा श्रमजीवी वर्ग अज्ञानात बुडून गेलेला आहे. ...आणि आपल्याला रुचो वा न रुचो, आपल्या भविष्यकालीन आकांक्षापूर्तीचे एकमेव आश्वासन, एकमेव संधी या श्रमजीवी वर्गातच सामावलेली आहे."

या लेखमालेच्या प्रकाशनामुळे राजकीय वर्तुळात खळबळ माजली. त्या साप्ताहिकाशी न्या. महादेव गोविंद रानडे यांचा निकट संबंध होता. त्यांनी देशपांड्यांना बजावले, "तुमच्यावर राजद्रोहाचा खटला होण्याचा संभव आहे." आता देशपांडे मोठ्याच अडचणीच्या परिस्थितीत सापडले आणि त्यांनी स्वतःची टीका थोडी सौम्य करण्याची नाही तर तीहून कमी प्रक्षोभक असे काही तरी लिहिण्याची विनंती श्री अरविंदांना केली. या विनंतीमुळे लेखमाला लिहिण्याचा श्री अरविंदांचा सारा उत्साहच मावळला. राजकारणाच्या प्रत्यक्ष कार्याची बाजू दूर सारून मग ते राजकीय तत्वज्ञानावरच लेख लिहू लागले. पण त्याचा देखील त्यांना लवकरच वीट आला.

काय करता येईल याचा अधिक पक्केपणाने निर्णय घेता यावा यासाठी श्री अरविंदांनी देशातील परिस्थितीचा सूक्ष्म अभ्यास केला. मग 1898-99 मध्ये त्यांनी पहिले पाऊल उचलले. स्वतः जातीने खटपट करून त्यांनी पुढे निरालंबस्वामी म्हणून प्रसिद्धीस आलेल्या जतीन्द्रनाथ बानर्जी या बंगाली युवकाला बडोदा संस्थानच्या सेनेत भरती करून घेतले. पुढे भारताच्या दास्यविमोचनासाठी करावयाच्या चळवळीचा कार्यक्रम हाती घेऊनच जतींद्र बंगालमध्ये परत गेला. त्या दृष्टीने बाह्यतः सांस्कृतिक, बौद्धिक, नैतिक अशा वरपांगी उद्दिष्टांसाठी युवकांच्या संघटना स्थापन करायला हव्या होत्या आणि आधीच अस्तित्वात असलेल्या संघटनांनाही क्रांतिकार्याकडे वळवून घेणे अवश्य होते. तसेच शेवटच्या सैनिक चढाईला उपकारक ठरतील अशा कार्याचे शिक्षणही युवकांना द्यावयाचे होते. या योजनेचा लगेच अंगीकार करण्यात आला.

मध्यतंरीच्या काळात श्री अरविंदांनी भारतीय स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्याच्या दृष्टीने क्रांतिकारी कार्य संघटित करण्यासाठी स्थापन झालेल्या एका गुप्त मंडळाच्या सदस्यांची भेट घेऊन त्या मंडळाची शपथही घेतली होती. तिच्या विचारविमर्श समितीशी त्यांचा मुंबईत परिचय करून देण्यात आला.

1901 मध्ये बारीन बडोद्यास आला आणि त्यामुळे त्यालाही क्रांतिकार्यासाठी सज्ज करण्याची संधी श्री अरविंदांना लाभली. बारीन त्या गुप्त मंडळात प्रविष्ट झाला. एका हाती तलवार आणि दुसऱ्या हाती भगवद्‌गीता घेऊन त्याने शपथ घेतली. "माझ्या जिवात जीव आहे आणि भारत दास्यशृंखलांतून मुक्त होत नाही तोपर्यंत मी क्रांतिकार्य चालूच ठेवीन. कधी काळी या मंडळातला एखादा शब्द किंवा एखादी घटना जरी मी प्रकट केली किंवा कोणत्याही प्रकारे या मंडळावर चुकून आपत्ती ओढवून आणली, तरी त्या अपराधासाठी मी प्राणांचेही मोल देईन."

श्री अरविंदांच्या मते भारताचे स्वातंत्र्य हा केवळ राजकीय खेळ नसून ते भूतलावर परमेश्वराचे राज्य स्थापन करण्याच्या दिशेने टाकलेले पहिले पाऊल होय. बडोदे हे त्यांचे प्रमुख वास्तव्यस्थान असले तरी, त्यांचे राजकीय कार्य मात्र उभ्या भारतभर, विशेषतः बंगाल, गुजरात व महाराष्ट्र या प्रांतांतून, पसरलेले होते.

श्री. पी. मित्र आणि क्रांतिवादी गटाचा इतर नेतृवर्ग यांना आपले गुप्त मंडळ आणि त्याची उद्दिष्टे यांविषयी सांगण्यासाठी श्री अरविंद 1902 त बंगालमध्ये गेले आणि त्या साऱ्या नेत्यांनी या मंडळाची शपथ घेतली. प्रस्तुत गुप्त मंडळाच्या कार्यात दहशतवादाचा समावेश नव्हता हे या संदर्भात ध्यानी घ्यायला हवे. परंतु बंगालमध्ये चाललेली दडपशाही आणि त्या दडपशाही विरुद्ध त्या प्रांताची प्रतिक्रिया यांचे स्वाभाविक पर्यवसान बंगालमध्ये दहशतवादी पक्ष बळावण्यात झाले. याच वर्षी श्री अरविंद कॉंग्रेसच्या अहमदाबाद येथील अधिवेशनाला उपस्थित होते. टिळकही या अधिवेशनाला आलेले होते. त्यांनी श्री अरविंदांना बाहेर नेले आणि त्यांच्याशी तासभर संभाषण केले. समाजसुधारणेच्या चळवळीविषयी टिटकारा व्यक्त करून महाराष्ट्रातल्या चळवळीसाठी स्वतः अवलंबिलेल्या मार्गाचेही टिळकांनी स्पष्टीकरण केले.

1903 मध्ये श्री अरविंदांनी 'तडजोड नाही' या नावाची एक पुस्तिका लिहिली आणि 'अविनाश' नावाच्या क्रांतिवादी गटाच्या एका सदस्याने ती गुप्तपणे छापूनही काढली.

1904 मध्ये मुंबईत सर हेन्री कॉटन यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या कॉंग्रेस अधिवेशनालाही ते उपस्थित होते. सर हेन्री यांनी 'भारतीय संयुक्त संस्थानां'च्या कल्पनेला पाठिंबा दिला पण तो ब्रिटिश साम्राज्याचीच एक वसाहत या नात्याने. श्री अरविंदांनी मात्र सुसंगतपणे संपूर्ण स्वातंत्र्याचीच भूमिका घेतली होती. याच वर्षी चारुचंद्र दत्त (आय.सी.एस.) यांची भेट घेऊन श्री अरविंदांनी त्यांना 'भवानीमंदिर उद्देशपत्रक' समजावून दिले. श्री अरविंदांनीच ते लिहिले होते आणि त्याला राष्ट्रीय चळवळीचे 'बायबल' (प्रमाणग्रंथ) म्हणता येईल. श्री अरविंद आणि त्यांचे क्रांतिकार्य यांचा हिरिरीने पुरस्कार करणारे आय.सी.एस्. चे पश्चिम भारतातले आणखी एक सदस्य जी.डी. माडगावकर हे होत. उद्देशपत्रकातले काही उतारे पुढे दिले आहेत:

"आपण जितका अधिक खोल दृष्टिक्षेप करू तितके आपल्या अधिक प्रत्ययास येईल की अन्य साऱ्या गोष्टी मिळविण्यापूर्वी जी एकुलती एक उणीव भरून काढण्याचा प्रयत्न आपल्याला करायला हवा आहे ती म्हणजे सामर्थ्याची उणीव –शारीरिक सामर्थ्य, मानसिक सामर्थ्य, नैतिक सामर्थ्य आणि सर्वांत श्रेष्ठ असे आध्यात्मिक सामर्थ्य. तेच इतर साऱ्या सामर्थ्यांचे अनंत व अविनाशी उगमस्थान असते. आपल्यापाशी एक सामर्थ्य असेल तर अवशिष्ट उरलेले सारे काही आपल्याला लीलया आणि स्वाभाविकरीत्या मिळून जाईल. पण सामर्थ्याच्या अभावी मात्र जे लोक हात असून पकड घेऊ किंवा प्रहार करू शकत नाहीत, जे पाय असून धावू शकत नाहीत, अशा स्वप्नातल्या माणसांसारखीच आपली अवस्था होऊन जाईल!

सामर्थ्याला आकस्मिकपणे आश्चर्यकारक उधाण आल्याचे जपानपेक्षा अधिक ठळक उदाहरण इतिहासात एकदेखील नाही. या उधाणाचे कारण शोधून काढण्याच्या

उद्‌देशाने सर्व प्रकारचे सिद्धान्त मांडले गेले. परंतु या प्रबळ जागृतीचे मूळ स्रोत, या अनंत सामर्थ्याचे मूळ उगमस्थान कोणते हे आता जपानमधील प्रज्ञावंत स्वतःच सांगू लागले आहेत. ती दोनही धर्मातूनच उदयास आली होती. अर्जुनाने गांडीव धनुष्य पेलावे तितक्याच लीलेने आणि अपराजिततेने जपान पाश्चात्य ज्ञानविज्ञानाची प्रचंड साधनसामग्री वापरू शकला, याची कारणे मिकॅडोच्या व्यक्तित्वाच्या रूपाने जपानच्या राष्ट्रीय शक्तीची उपासना करणाऱ्या शिंटो संप्रदायाचे घडून आलेले पुनरुत्थान आणि ड्योमीची वेदान्ती शिकवण, हीच होत.''

करावयाचे कार्य आणि पाळावयाचे नियम यांचा सविस्तर निर्देश 'भवानीमंदिर' उद्‌देशपत्रकाच्या परिशिष्टात केला होता.

नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांच्या अध्यक्षतेखाली 1905 मध्ये वाराणसीत भरलेल्या काँग्रेस अधिवेशनालादेखील श्री अरविंद उपस्थित राहिले. ते स्वतः प्रकट बैठकींना उपस्थित राहात नसत, परंतु त्यांना भेटून राष्ट्रीय चळवळीचे नेते त्यांच्याशी कार्यक्रमासंबंधी चर्चा करीत आणि तदनुसारच कार्य करीत.

सर्व प्रकारच्या निषेधांना न जुमानता 16 ऑक्टोबर 1905 ला बंगालची फाळणी झालीच. तिच्याविरुद्ध प्रचंड प्रक्षोभही उसळला. 'वंदे मातरम्'च्या गर्जना आकाश भेदू लागल्या आणि शासनाने तत्काळ त्या घोषणेचा उच्चार करण्यावर बंदी घातली. तिचा परिणाम मात्र अपेक्षेच्या नेमका उलटा झाला आणि 'वंदे मातरम्' हा देशाचा मंत्रच होऊन बसला.

'वंदे मातरम' हे बंकिमचंद्रांनी लिहिलेल्या 'आनंदमठ' या 1882 साली प्रसिद्ध झालेल्या कादंबरीत वारंवार येणाऱ्या एका गीताचे पालुपद आहे. क्रूर मुसलमान राजांशी आणि ब्रिटिश व्यापाऱ्यांशी लढत देताना 'वंदे मातरम्' हे स्फूर्तिदायक गीत या कादंबरीतील बंडखोर संन्यासी गात असत. आनंदमठातील या गीताला आता स्वतंत्र भारताच्या दोन राष्ट्रगीतापैकी एक या नात्याने मान्यता लाभली आहे.

राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यात प्रत्यक्ष आणि सक्रिय भाग घेत असूनही अद्यापि बडोदे संस्थानातील चाकरीचे त्यागपत्र दिलेले नसल्याने श्री अरविंद पडद्यामागे राहूनच सूत्रे हलवीत असत.

4

# बंगाल

1905 मधील बंगालची फाळणी हे श्री अरविंदांच्या दृष्टीने एक प्रकारचे वरदानच ठरले. आता ते स्वतः राष्ट्रीय स्वातंत्र्यसंग्रामात उघडपणे सक्रिय भाग घेऊ लागले.

14 एप्रिल 1906 ला ते बारिसाल परिषदेला उपस्थित होते. शासनाने ही परिषद अवैध असल्याची घोषणा केली. त्या घोषणेच्या निषेधार्थ काढलेल्या मिरवणुकीच्या अग्रभागी श्री अरविंद, श्री. बिपिन पाल व श्री बिपिनचंद्र चॅटर्जी हे वीर होते. या मिरवणुकीवर लाठ्या चालविण्यात आल्या आणि कित्येकजण घायाळ झाले. पुढे श्री अरविंद, बिपिन पाल यांजसह बंगालमध्ये निरीक्षण-प्रवासार्थ गेले. त्यावेळी प्रचंड सभा घेण्यात आल्या. एका जिल्ह्यात तर जिल्हाधिकाऱ्यांनी काढलेली सभाबंदीची आज्ञाही धुडकावून लावण्यात आली.

1906 च्या मार्चमध्ये बारीनच्या सूचनेवरून 'युगांतर' नावाचे एक बंगाली साप्ताहिक काढण्यात आले. श्री अरविंदांनी प्रारंभीचे लेख स्वतःच लिहिले आणि त्या पत्रिकेवर सर्वसाधारण नियंत्रणही ठेवले. 'युगांतर' उघडपणे बंडाचा प्रचार करी आणि छुप्या युद्धाचे पाठही त्यात प्रकाशित होत. त्याच्या एका उपसंपादकावर, स्वामी विवेकानंदांच्या बंधूंवर, खटला भरण्यात आला. पण आपण ब्रिटिश शासन मानीत नसल्याचे कारण सांगून त्यांनी स्वतःचा बचाव करण्यासही नकार दिला.

स्वराज्य पदरात पडेतो राष्ट्राने अवलंबावयाच्या राष्ट्रवादी कार्यक्रमाचा शुभारंभ याच कालखंडात प्रथम करण्यात आला. संपूर्ण स्वराज्य, म्हणजेच पूर्ण व मर्यादारहित स्वराज्य हेच भारतातील राजकीय चळवळीचे उद्दिष्ट असल्याचे घोषित करण्यास पुढे ठाकलेले श्री अरविंद हेच पहिले राजकारणी पुरुष होत. स्वदेशी वस्तूंचाच उपयोग, विदेशी वस्तूंवर बहिष्कार, निःशस्त्र प्रतिकार, असहकार, राष्ट्रीय शिक्षण, वैध संघर्षाचा सार्वजनिक पंचाद्वारा निवाडा, इत्यादी अंगांचा प्रभावी प्रचार करणारे अनेक लेखदेखील त्यांनी लिहिले. देशानेही या कार्यक्रमाचे पालन काटेकोरपणे आणि उत्साहाने केले.

1906 च्या ऑगस्टमध्ये कलकत्याच्या राष्ट्रीय महाविद्यालयाचे (आताचे जादवपूर विद्यापीठ) पहिले प्राचार्यपद श्री अरविंदांनी मासिक रु. 150 च्या नाममात्र वेतनावर स्वीकारले. हे महाविद्यालय 'जातीय शिक्षा परिषदे'च्या विद्यमाने स्थापन झाले होते.

बिपिन पाल या राष्ट्रवादी पुढाऱ्याने 6 ऑगस्ट 1906 ला 'वंदे मातरम्' नावाचे वृत्तपत्र काढले. त्याच्या संपादनास हातभार लावण्याविषयी त्यांनीच श्री अरविंदांना विचारले असता त्यांनी संमतीही दिली, एवढेच नव्हे तर कलकत्यातील राष्ट्रवादी नेत्यांची एक अप्रकट बैठकही त्यांनी भरविली. त्या नेत्यांनी प्रस्तुत पत्राला आपल्या पक्षाचे मुखपत्र म्हणून मान्यता दिली.

पुढे या पत्राच्या संपादकाचे काम श्री अरविंदच पाहू लागले, परंतु संपादक म्हणून त्यांचे नाव मात्र त्या पत्रावर कधीच आले नाही. श्री अरविंद कारावासात गेल्यावर शासनाने त्याच्या प्रकाशनावर बंदी घातली. ते वृत्तपत्र आर्थिकदृष्ट्या अडचणीत होते आणि ते सन्मानपूर्वक व गाजावाजा होऊन बंद व्हावे अशी संपादकांची इच्छा होती. म्हणून शासन प्रक्षुब्ध होऊन वैध उपाययोजना, कार्यवाही करील असा एक लेख त्यांनी जाणूनबुजून प्रसिद्ध केला होता.

यावेळी दादाभाई नवरोजींच्या अध्यक्षतेखाली कलकत्यास भरलेल्या राष्ट्रसभेच्या अधिवेशनाला श्री अरविंद व त्यांचे सहकारी उपस्थित होतेच. तेथे स्वराज्याची मागणी करणारा ठराव राष्ट्रसभेच्या इतिहासात प्रथमच संमत करण्यात आला. स्वराज्य म्हणजे संपूर्ण स्वातंत्र्य —इतके संपूर्ण की इंग्लंडमध्ये इंग्रज व्यक्ती किंवा अमेरिकेत अमेरिकन व्यक्ती जितकी स्वतंत्र असते तितकीच भारतीय व्यक्तीही भारतात स्वतंत्र असायला हवी— हे राष्ट्रवाद्यांनी स्पष्टपणे बजावले. मवाळांनी मात्र त्याचा अर्थ नुसते वसाहतीचे स्वराज्य असाच लावला.

एका वाचकाकडून आलेले राजद्रोहाचा प्रसार करणारे पत्र प्रसिद्ध केल्याचे निमित्त पुढे करून, 24 जुलै 1907 ला श्री अरविंद आणि बिपिन पाल यांजवर खटला भरला गेला. शिक्षा ठोठावली जाणार हे निश्चित दिसत होते. रवींद्रांनी 'होमेज टू श्री अरविंदो' (श्री अरविंदांना आदरांजली) ही आपली प्रसिद्ध कविता लिहिली. परंतु न्यायालयाने संपादकाचे नाव विचारले त्या वेळी ते प्रकट करण्यास बिपिन पाल यांनी नकार दिला. न्यायालयाबद्दल असा तिरस्कार व्यक्त केल्यामुळे त्यांना सहा महिने कारावासाची शिक्षा ठोठावली गेली. परंतु पाल यांनी नाव प्रकट करण्याचे नाकारल्यामुळे व श्री अरविंदच संपादक असल्याचे सिद्ध न करता आल्याने त्यांना निर्दोष ठरवावे लागले.

1907 च्या नोव्हेंबरमध्ये बंगाल प्रांतिक परिषदेच्या मिदनापूर येथील अधिवेशनात आणि कालांतराने हुगळीच्याही अधिवेशनात श्री अरविंदांनी राष्ट्रवादी पक्षाचे नेतृत्व केले. त्यांनी अथपासून इतिपर्यंत संपूर्ण स्वातंत्र्यावरच भर दिला. उभ्या जगाविषयीच्या एकात्म दृष्टिकोनाचा, हे स्वातंत्र्य हा एक पैलू होता. आंतरराष्ट्रीय सौहार्द प्रस्थापित करण्याच्या कार्यात भारताला एक महान कामगिरी पार पाडावयाची आहे अशी त्यांची दृढ धारणा असल्याने त्यांनी लिहिले, "आजच्या घडीला जिची अत्यंत निकड आहे अशा एका सामर्थ्यशाली चळवळीला चालना देण्याचे कार्य 'झाइटगाइस्टने' म्हणजेच युगधर्माने

स्वतःच चालविले आहे. आशिया खंडाचे पुनरुत्थान हाच या चळवळीचा आशय असून भारताचे पुनरुत्थान हा त्या महत्तर चळवळीचा नुसता एक अपरिहार्य घटकच नव्हे, तर तिची केंद्रवर्ती निकडही आहे. भारत हीच त्या तोरणाची मध्यशिला आहे; आशियाच्या सर्वसाधारण भागधेयाचा उत्तराधिकारी भारतच आहे. ऋषींच्या भूमीत जन्माला आलेल्या स्वतंत्र व सुसंघटित भारताच्या कल्पनेने आज परमोच्च उत्कर्ष साधला असून एका महान् संस्कृतीचे आध्यात्मिक सामर्थ्य तिच्या पाठीशी एकवटू लागलेले आहे.'' हाच साक्षात्कार त्यांना घडला होता. इंग्लंड व इंग्लिश लोक यांविषयी द्वेषभाव मात्र त्यांच्या मनात कधीच नव्हता.

26 डिसेंबर 1906 ला श्री अरविंद राष्ट्रसभेच्या सुरत येथील गाजलेल्या अधिवेशनाला गेले. राष्ट्रवादी आणि मवाळ यांच्यामधली दरी रुंदावत गेली होती. ही फाटाफूट कलकत्ता अधिवेशनाने संमत केलेल्या ठरावावरच केंद्रित झालेली होती. ती आधारभूत मानून त्याच्या पालनास प्रारंभ करावा अशी राष्ट्रवाद्यांची मनीषा होती. परंतु मवाळ मात्र 1906 तला हा ठराव बंधनकारक मानायला सिद्ध नव्हते; आणि स्वागतसमितीत तर त्यांचेच मताधिक्य होते. म्हणून तो ठराव एकदम प्रकट अधिवेशनातच मांडावयाची योजना राष्ट्रवाद्यांनी आखली होती. पण अध्यक्षीय निवडणकीवरूनच कटकटींना आरंभ झाला. सुरेंद्रनाथांनी डॉ. रासबिहारी घोष यांचे नाव सुचविले, तर टिळक, लजपत राय यांना पाठिंबा देण्यास उभे राहिले. त्यामुळे संतापून जाऊन मवाळ पक्षीय स्वयंसेवकांनी टिळकांना हाणण्यासाठी एक खुर्चीच उचलली. उलट राष्ट्रवाद्यांनी एक जोडा व्यासपीठाकडे भिरकावला आणि त्यावर चालही केली. मग एकच गोधळ माजला आणि शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित करण्याकरिता मवाळांनी रक्षाविभागाला (पोलिस) पाचारण केले.

एका व्यक्तिगत पत्रात एकदा अरविंदांनी लिहिले आहे, "जिचे पर्यवसान राष्ट्रसभेचे अधिवेशन उधळण्यात झाले ती आज्ञा मीच (टिळकांना विचारल्यावाचून) दिली होती हे फारच थोड्या लोकांना ठाऊक असेल.''

5

# अलिपूर खटला

उत्तर कलकत्यात श्री अरविंदांची माणिकतला उद्यान नावाची कौटुंबिक स्थावर मालमत्ता होती तेथे बारीनने क्रांतिकारकांसाठी एक केंद्र स्थापन केले होते. ते लोक तेथे क्रांतिवादी साहित्य आणि गीता शिकत, ध्यानधारणा करीत, तसेच बॉम्ब बनविण्याचे प्रयोगही करीत. एवढे मात्र ध्यानात ठेवायला हवे की पुढे क्रांतिवादाला ज्या दहशतवादाचे स्वरूप आले तो श्री अरविंदांना कधीच अभिप्रेत नव्हता. त्यांना उभ्या भारतभर प्रकटपणे सशस्त्र क्रांती व्हायला हवी होती.

राष्ट्रवाद्यांनी केलेल्या संपूर्ण स्वातंत्र्याच्या मागणीमुळे शासनकर्ते फारच भयभीत झाले. पाशवी शिक्षा ठोठावून क्रांतिकारकांना घाबरवून सोडण्याचा खटाटोप त्यांनी आरंभला. कलकत्याचे एक प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट, किंग्जफर्ड, यानी सुशील सेन या पंधरा वर्षे वयाच्या मुलाला स्वतः समक्ष फटके देण्याची शिक्षा सांगितली. परिणामी सुशीलची शुद्ध हरपून तो अर्धमेला झाला. हा अपमान हे क्रांतिकारकांना एक आव्हानच वाटले आणि खुदीराम बोस व प्रफुल्ल चाकी यांनी प्रतिटोला हाणण्याचा निर्धार केला. या संकटाचा सुगावा लागून किंग्जफर्डनी स्वतःची मुझ्झफरपुरास बदली करून घेतली. या दोघा युवकांनी त्यांचा पाठलाग केला आणि 30 एप्रिल 1908 ला त्यांची गाडी क्लबातून बाहेर पडत असताना, तिच्यात साहेब असतील अशा चुकीच्या समजुतीने, खुदीरामने तीवर बॉंब फेकला. कोणी एक श्रीमती केनेडी आणि तिची कन्या अशा दोन स्त्रिया त्या गाडीतून जात होत्या, त्या मारल्या गेल्या. हे वृत्त समजताच माणिकतला उद्यानातून कार्यकर्ते व साधनसामग्री काढून नेण्याची सूचना श्री अरविंदांनी बारीनला केली. बारीनने ती पाळली पण पूर्णपणे मात्र नव्हे. त्याच्या चुकीचे दुष्परिणाम त्याच्या जोडीला इतरांनाही भोगावे लागले. 2 मे 1908 च्या मध्यरात्री उद्यानावर धाड घालून रक्षापथकाने बॉंब आणि शस्त्रे शोधून काढली. बारीनला व त्याच्या बरोबर असलेल्या मंडळींना अटक झाली.

अशा प्रकारे शासन दीर्घकाल शोधीत असलेली श्री अरविंदांवर झडप घालण्याची संधी एकदाची चालून आली. वस्तुतः किंग्जफर्ड आणि केनेडी मातापुत्री यांच्या संदर्भात जे घडले त्याच्याशी श्री अरविंदांचा काही एक संबंध नव्हता. पण 3 मे 1908 च्या पहाटेस त्यांच्या ग्रे स्ट्रीटवरच्या घरावर धाड घालून आरक्षकांनी त्यांना अटक केली.

घराची पुरी झडती घेऊन त्यांचे व्यक्तिगत लिखाण, पत्रव्यवहार, इत्यादी गोळा करून नेले.

श्री अरविंदांना प्रथम लाल बझार पोलिस चौकीवर व तेथून अलिपूर कारागृहात नेले. अभियुक्त बंदीच्या नात्याने त्यांचे कारागृहातले जीवन 5 मे 1908 ला चालू झाले. पुढील वर्षी 6 मेस त्यांची कारावासातून सुटका झाली.

अशा प्रकारे अलिपूरच्या महान खटल्याला प्रारंभ झाला. आरोपींची एकूण संख्या 49 होती, तर साक्षीदारांची 206. कागदपत्रे 400 नोंदली गेली आणि बॉम्ब, पिस्तुले, दारुगोळा, डिटोनेटर, फ्यूज, विषारी आम्ले इत्यादीसकट 5000 वस्तू पुरावा म्हणून सादर करण्यात आल्या. माफीचा साक्षीदार बनलेल्या नरेंद्र गोस्वामी या आरोपीला कनाईलाल दत्त व सत्येंद्र बोस यांनी गोळ्या घातल्या आणि त्यापायी कनाईलालला स्वतःच्या जीवनाचे मोल द्यावे लागले. त्याला कारागृहात फासावर चढविण्यात आले.

सी.बी. बीचक्रॉफ्ट हे आय.सी.एस. अधिकारी श्री अरविंदांसकट इतरांचा खटला चालवणारे पुरवणी सत्र न्यायाधीश म्हणून काम पाहात होते. ते किंग्ज कॉलेजातले श्री अरविंदाचे सहाध्यायी होते. दोघेही डोळ्यांत भरण्याजोगे बुद्धिमान विद्यार्थी असून आज बंदी असलेल्या अरविंदांनी आता न्यायाधीश झालेल्या बीचक्रॉफ्टना शेवटच्या परीक्षेच्या वेळी हारवले होते. आरोपींना तारेच्या जाळीमागे बसविले होते आणि संगीनधारी पोलीस न्यायालयभर पहारा तारेच्या जाळीमागे बसविले होते आणि संगीनधारी पोलीस न्यायालयभर पहारा देत खडे होते. मुख्य शासकीय वकील अर्डली नॉर्टन हे खटल्याच्या सुनावणीच्या काळात आपल्या कागदापत्रांच्या ब्रीफकेसवर (पत्रमंजूषेवर) सतत गोळ्या भरलेले पाच कप्प्यांचे पिस्तुल ठेवून असत. श्री अरविंदांना दोषी ठरविण्याचे सर्व प्रकारचे प्रयत्न झाले. निकालाच्या प्रारंभीच्या भागात बीचक्रॉफ्टनी लिहिले होते, "आता मी अभियोगातले सर्वांत महत्त्वाचे आरोपी अरविंद घोष यांच्याकडे वळतो. दुसऱ्या कोणाहीपेक्षा त्यांनाच दोषी ठरविण्याची चिंता शासकीय पक्षाला लागून राहिलेली होती; आणि आरोपीच्या पिंजऱ्यात ते नसते, तर खटला कधीच संपला असता यात संदेह नाही."

श्री अरविंदांचा पक्ष चित्तरंजन दास लढवीत होते. त्यांनी अरविंदांच्याच निवेदनातले भाग वाचून दाखविले :

"आपल्यासमोर चाललेला माझा संपूर्ण खटला हा असा आहे. मी माझ्या राष्ट्राला स्वातंत्र्याचे ध्येय शिकविले आणि हे कार्य कायद्याच्या विरुद्ध आहे असे म्हणायचे असेल, तर या अपराधाच्या संदर्भात मी दोषी आहे हे मी मान्य करतो. स्वातंत्र्याचे धडे देणे हा अपराध असेल, तर तो मी केला हे मला मान्य आहे. त्यासंबंधी मी कधीच वाद घातलेला नाही. पाश्चात्य तत्त्वज्ञानातले सिद्धान्त स्वीकारून, मी त्यांची वेदान्त तत्त्वज्ञानाच्या अमर शिकवणीशी सांगड घालून दिली आहे.

राष्ट्रांच्या मित्रमंडळात भारताला काही विशेष कामगिरी पार पाडावयाची आहे

याची जाणीव करून देण्याच्या दृष्टीने स्वदेशाला धडे देण्याचे काम माझ्या वाट्याला घातलेले आहे असा माझा विश्वास आहे.

हा माझा दोष असेल, तर तुम्ही मला साखळदंडांनी जखडा, कारागृहात टाका; पण हा आरोप नाकारणारे शब्द मात्र तुम्ही माझ्या तोंडून कधीच वदवू शकणार नाही. केवळ स्वातंत्र्याचे पाठ दिले एवढ्यासाठी मी कायद्याच्या कोणत्याच कलमात सापडत नाही हे आपल्या निदर्शनास आणण्याचे धाडस मी करीत आहे आणि मजवर ज्या कृतींचा आरोप ठेवण्यात आलेला आहे त्यासंबंधी सांगायचे, तर माझे म्हणणे असे की तसा कोणताच पुरावा नोंदला गेलेला नाही. तसेच तो आरोप मी जे जे म्हणून शिकविले, लिहिले, त्या साऱ्याशी व पुराव्यात स्पष्ट दिसून आलेल्या माझ्या मनोवृत्तीशीही सर्वस्वी विसंगत आहे."

मग दासांनी स्वतः न्यायालयासमोर पुढील भाषण केले:

"मला आपल्याला आग्रहाने असे सांगायचे आहे की नसते अपराध अंगी लावून आरोपी बनविलेला यांच्यासारखा पुरुष केवळ याच न्यायालयाच्या नव्हे, तर इतिहासरूपी उच्चतम न्यायालयाच्याही न्यायसभेसमोर उभा असतो. तसेच मला आपल्याला हेही निवेदन करायचे आहे की हा संघर्ष मिटून सगळे शांत झाल्यानंतर, हा गदारोळ निवळल्यानंतर, ही चळवळ थांबल्यानंतर, फार काय आरोपी स्वतः मरणाधीन होऊन इहलोक सोडून गेल्यानंतरदेखील, लोक त्याच्याकडे दीर्घकालपर्यंत देशभक्तीचा उद्गाता, राष्ट्रवादाचा द्रष्टा आणि मानवतेचा ऋषी प्रियसखा याच दृष्टीने पाहतील. तो इहलोकातून निघून गेल्यावरसुद्धा दीर्घकालपर्यंत त्याचे शब्द, केवळ भारतातच नव्हे, तर दूरस्थ सागरांच्या आणि भूप्रदेशांच्या पलीकडेही निनादत आणि दुमदुमत राहतील. म्हणून मी आपणास बजावून सांगतो की त्यांच्या भूमिकेवरील पुरुष हा केवळ याच नव्हे तर इतिहासरूपी उच्च न्यायालयाच्याही न्यायमंडळापुढे उभा असतो.

महाराज, आपण आपल्या निर्णयाचे मनन करण्याची वेळ आता आलेली आहे. इंग्रजी इतिहासात सर्वांत गौरवशाली अध्याय बनून राहिलेल्या इंग्लिश न्यायपद्धतीच्या साऱ्या परंपरांचा निर्वाळा देऊन मी आपणास आवाहन करीत आहे. आज्ञापालन अपरिहार्य होऊन जावे, इतकेच नव्हे, तर ज्यांच्या ज्यांच्या खटल्यात विधियुक्त निर्णय दिला त्या साऱ्यांनाच अटळपणे आदरभाव वाटावा अशा विधिवत् पद्धतीने ज्या सन्माननीय न्यायाधीशांनी निर्णय दिलेले आहेत त्या सर्वांच्या नावाने मी आपणास आग्रहपूर्वक विनवीत आहे. इंग्लिश न्यायपद्धतीतून उदयाला आलेल्या सहस्रवधी विधिवतत्त्वांच्या आणि जे जे काही उदात्त आहे त्या साऱ्याच्या वतीने मी आपणास कळकळीचा अनुरोध करीत आहे. एक इंग्लिश न्यायाधीश न्यायाचा पाठपुरावा करण्याचे विसरून गेले असे म्हणण्यास वाव देऊ नका."

नंतर भारतीय ज्यूरींकडे (पंचांकडे) वळून दासांनी त्यांना पुढील शब्दांत निवेदन केले:

"सद्गृहस्थहो, श्री अरविंदांनी ज्या ध्येयाचे पाठ दिले, त्याचे तसेच आपल्या देशातल्या साऱ्या परंपरांचे नाव घेऊन मी आपल्याला विनंती करीत आहे. त्यांचे स्वतःचेच दोन देशबांधव विकारांच्या आणि पूर्वग्रहांच्या आहारी गेले आणि तात्कालिक ओरडीपुढे झुकले असे म्हटले जाऊ देऊ नका."

शेवटी न्यायाधीशांनी निर्णय दिला. "नरेंद्र बक्षी, सैलेंद्रकुमार सेन, नलिनीकान्त गुप्त, पूर्णचंद्र सेन, विजयकुमार नाग, कुंजलाल शब, हेमेंद्रनाथ घोष, धारिणीनाथ गुप्त, बीरेन्द्रनाथ घोष, विजय भट्टाचारजी, हेमचंद्र सेन, प्रोभासचंद्र देव, दीनदयाल बोस, निखिलेश्वर राय, मौलिक, देवब्रत बोस, अरविंद घोष हे सारेच 121,121 अ व 122 या कलमांनुसार निरपराध ठरतात. तसेच 123 कलमाखालीही ते सर्व दोषी ठरत नाहीत." सी.सी. बीचक्रॉफ्ट.

वर उल्लेखिलेले थोडे जण आणि श्री अरविंद यांना दोषमुक्त करण्यात आले. परंतु इतरांना मात्र शिक्षा झाल्या. बारीन व उल्लासकर यांना मृत्युदंड सांगण्यात आला पण पुढे शिक्षा सौम्य करून आजन्म कारावास सांगितला. तरीदेखील त्यांची सुटका 1920 मध्येच झाली.

# 6

# योग

अलिपूर अभियोगातून निर्दोष सुटल्यानंतर श्री अरविंदांच्या इहलोकातील कामगिरीचा नवा अध्याय चालू झाला. भारताची दास्यमुक्ती निश्चितपणे व्हावयाची असून ते ध्येय आणि त्याच्या सिद्धीचे उपाय राष्ट्रासमोर कधीच सादर करण्यात आलेले आहेत, आणि म्हणून श्री अरविंदांनी पुढच्या टप्प्याची-अखिल मानवजातीच्या दास्यमुक्तीची-पूर्वसिद्धता करून ठेवायला हवी आहे, असा आंतरिक आदेश त्यांना मिळाला. कारावासात असतानाच त्यांच्या अंतर्गत आवाजाने त्यांना सांगितले होते, "मला दुसरेच काम तुजवर सोपवावयाचे आहे आणि त्यादृष्टीने जे तुला स्वतः होऊन शिकता येण्यासारखे नव्हते त्याचे धडे तुला द्यावे आणि माझ्या कार्याचे प्रशिक्षणही तुला द्यावे याच उद्देशाने मी तुला येथे आणले आहे."

कारावासातून सुटल्यानंतर त्यांनी पहिले व्याख्यान उत्तरापाड्यात दिले. तेव्हा ते म्हणाले, "राष्ट्रवाद हा एक संप्रदाय, एक धर्म, एक निष्ठा आहे असे यापुढे मी म्हणणार नाही. मी म्हणतो, आमच्या दृष्टीने सनातन धर्म हाच मुळी राष्ट्रवाद होय. हिंदू राष्ट्र सनातन धर्म, सनातन धर्म घेऊनच जन्माला आलेला आहे, ते त्याच्या साथीनेच वाटचाल करीत आहे आणि त्याच्या संगतीनेच वृद्धिंगतही होत आहे. सनातन धर्माची अवनती होते तेव्हा हिंदू राष्ट्रही अधोगतीला जाते आणि सनातन धर्माचा विनाश शक्य असेल, तर त्याच्या जोडीने हिंदू राष्ट्रही विनाश पावेल. सनातन धर्म म्हणजेच राष्ट्रवाद. तुमच्याजवळ मला सांगायचा आहे तो संदेश हाच होय." 1919 च्या जून महिन्यात त्यांनी कर्मयोगिन्‌मध्ये लिहिले:

'योग म्हणजे ज्ञान, भक्ती किंवा कर्म यासाठी परमेश्वराशी साधलेले सायुज्य. स्वतःच्या अंतरंगात आणि बाहेरही असलेल्या सर्वज्ञ व सर्व शक्तिमान अशा तत्त्वाशी योगी साक्षात संबंध साधीत असतो. तो अनंताच्या सुरात सूर मिळवतो; आपल्या स्वत्वाचा, औदार्याद्वारा असो किंवा उपकारशीलतेद्वारा असो, जगाला पुरवठा करण्यासाठी योगी स्वतःच परमेश्वराच्या शक्तीचा पाट बनतो; स्वतःवरील अहंची कात टाकून देऊन उन्नती साधतो आणि इतरांसाठी व इतरांच्याच सुखदुःखांनी जगत राहतो; भक्तिपूर्वक आणि उत्साहपूर्वक संपूर्णतया कार्यरत राहूनही तो फलाची चिंता मात्र टाकून देतो;

जयाविषयी उत्सुक नसतो आणि पराजयालाही भीत नसतो; स्वतःची सारी कर्मे तो ईश्वराला समर्पण करतो; आपला प्रत्येक विचार शब्द व कृती तो परमेश्वराच्या वेदीपुढे हविर्भाग म्हणून अर्पण करतो; उद्वेगातून व आसक्तीतून मुक्त होऊन निसर्गातील शक्तीसारखाच तो घाई न करता पण अविश्रांतपणे, अटळपणे व पूर्णत्वाने कार्यरत राहतो; मी देह, किंवा हृदय, किंवा मन, किंवा या तिहीचा समूह आहे; या कल्पनेच्या अतीत होऊन तो स्वतःच्या खऱ्याखुऱ्या आत्म्याचा शोध घेतो; स्वतःचे अमरत्व आणि मृत्यूचे असत्यत्व दोहोंची त्याला जाणीव होते; ज्ञानाचे आगमन झाल्याचे त्याच्या अनुभवास येते आणि आपण स्वतः अकर्मण्य असून आपले मन, वाचा ज्ञानेंद्रिये व कर्मेन्द्रिये यांच्याद्वारा दैवी शक्तीच अप्रतिहतपणे कार्य करीत असते हे त्याला जाणवू लागते; अशा प्रकारे आपण जे काही करतो किंवा असतो, किंवा जे काही म्हणून आपले आहे, ते सर्वेश्वराला, मानवतेच्या प्रियसख्याला व उपकारकाला वाहून टाकून तो निरंतर त्याच्याच ठायी वास करतो आणि मग दुःख, अशांती व खोटा भावप्रक्षोभ यांच्याही अतीत होतो; तोच योग होय. प्राणायाम, आसने, एकाग्रता, अर्चन, विधी, अनुष्ठान या गोष्टी स्वतःच योग नव्हेत, ती योगमार्गावरची साधने आहेत. तसेच योगमार्ग हा क्लेशकारक किंवा भयावह मुळीच नाही. अंतर्वर्ती शास्त्याला व गुरूला शरण जाणाऱ्यांना तो सुलभ व भयमुक्तच असतो. योग साधणे स्वभावतः सर्वच माणसांना शक्य असते. कारण ज्याला स्वभावतःच, विकसित किंवा बीजरूप अवस्थेतील, शक्ती, श्रद्धा किंवा भक्ती लाभलेली नाही असा एकही मनुष्य नाही आणि यातल्या कोणत्याही एका यष्टीचा आधार योग्याला पुरेसा असतो. सर्वच जण, एकाच जन्मात, या योगाच्या सर्वोच्च शिखराला पोहोचू शकणार नाहीत हे खरे; पण प्रगती मात्र सारेच जण करू शकतील. आणि मनुष्य ज्या प्रमाणात प्रगत होतो, त्या प्रमाणात त्याला शांती, शक्ती आणि आनंद यांचा लाभ होत असतो आणि या धर्माचा स्वल्पांशही व्यक्तीला किंवा राष्ट्राला मोठ्या भयातून मुक्त करू शकतो. *(स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात्)* आम्ही फिरून सांगतो की परमार्थ साधना ही जीवनापासून विभक्त झालेली गोष्ट आहे असं मानणं चूकच होय. ईशोपनिषद म्हणते, सर्वस्वाचा आनंद अनुभवता यावा यासाठी सर्वस्वाचा त्याग कर. *(तेन त्यक्तेन भुंज्जीथाः)* कोणाही व्यक्तीच्या धनाची अभिलाषा धरू नकोस. (मा गृधः कस्यस्विद्धनम्) शंभर वर्षे जगण्याची इच्छा बाळग. तुझ्या स्वतःच्याच कर्मांच्या बंधनातून मुक्त होण्याचा दुसरा कोणताही मार्ग तुला लाभलेला नाही. *(नान्यः पन्थाः विद्यतेऽयनाय)* धर्माची सर्वोच्च शिखरे या युद्धांच्या अतीत असतात असे मानणे चुकीचे आहे. श्रीकृष्णाने वारंवार उच्चारलेली घोषणा या युद्धाचाच आग्रह धरीत आहे. लढ आणि आपल्या विरोधकांना उखडून टाक. माझे स्मरण कर आणि लढ. *(मामनुस्मर युद्धय च)* परमार्थमय झालेल्या आणि वासना व स्वार्थी हाव यांतून मुक्त असलेल्या अंतःकरणाने तुझी कर्मे मला अर्पण कर *(मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा*

*निराशीनिर्ममो भूत्वा युद्धयस्व विगतज्वरः)* तुझ्या मनातला सारा विषाद तुजपासून दूर जाऊ दे. धर्मनिष्ठ मनुष्य स्वतःची सर्वसामान्य कर्मे टाकीत नसला तरी या जगातील धकाधकीच्या कर्तव्यांच्या मानाने मात्र तो अती साधुवृत्तीचा, अती हळवा किंवा अती विरक्त असतो अशी कल्पना करणे चूक होय. गीतेत दिलेल्या याच्या नेमक्या विरुद्ध अर्थाच्या उत्तराइतके आत्यंतिक आणि सडेतोड दुसरे काहीच असू शकणार नाही. ज्या कोणाची प्रकृती अहंकार टाकून शुद्ध झाली आहे, जो कोणी आपल्या कर्माची छाया आपल्या आत्म्यावर पडू देत नाही, त्याने उभ्या जगाचा वध केला, तरी तो कोणालाही मारीत नाही आणि बांधलाही जात नाही. *(यस्य सर्वेसमारंभाः कामसंकल्पवर्जिताः। हत्वा अपि स इमान् लोकान न हन्ति न निबध्यते।)*

बडोद्यात ज्या योगविशेषाला श्री अरविंदांनी प्रारंभ केला तोच आता प्रत्यक्ष व प्रकटपणे त्यांचे समग्र जीवनकार्य होऊन बसला. ते ज्याला 'एकात्मयोग' म्हणत त्या त्यांच्या योगाकडील वाटचालीचे तीन मूलभूत टप्पे आहेतः आकांक्षा, आत्मनिवेदन व त्याग. प्राणायामाच्या अभ्यासाला त्यांनी अगदी इ.स. 1904 इतक्या पूर्वीपासूनच प्रारंभ केलेला होता. त्यांनी स्वतःचे अनुभव पुढीलप्रमाणे वर्णिले आहे. "त्याचे परिणाम लक्षणीय होते. अनेक दृश्यांचे व आकृतींचे साक्षात् दर्शन मला घडत असे. स्वतःच्या मस्तकाभोवताली मला विद्युत्शक्ती जाणवे; माझी लेखनशक्ती जवळ जवळ आटून गेली होती. ती फिरून प्रचंड सामर्थ्याने उसळून आली आणि मला गद्य व पद्य प्रवाही शैलीत लिहिता येऊ लागले. तेव्हापासून तो स्रोत कधीच थांबला नाही. कालांतराने मी लिहिनासा झालो तो मला दुसरे काही तरी करावयाचे होते म्हणून. पण ज्या क्षणी मला लिहावेसे वाटते तत्क्षणी तो स्रोत सिद्धच असतो. तिसरे म्हणजे महान् आरोग्य; मी धट्टाकट्टा आणि बळकट बनलो; माझी त्वचा नितळ गोरी झाली आणि माझ्या लाळेत माधुर्य स्रवू लागले. स्वतःच्या मस्तकाभोवती एक प्रकारचे चैतन्यवलय जाणवू लागले, डास भरपूर होते, पण ते मजकडे फिरकतही नसत!"

इतरही काही अनुभव त्यांनी वर्णिले आहेत. "कालांतराने एक नाग संन्यासी आले आणि त्यांनी मला कालीस्तोत्र दिले. 'जहि' (तू मार) शब्दाने युक्त असलेले ते एक अत्यंत रौद्र स्तोत्र होते. मी ते वरचेवर म्हणत असे, पण त्यातून काहीच निष्पन्न झाले नाही.

ब्रह्मनंदांच्या मृत्यूनंतर केशवानंदांच्या उपस्थितीत मी गंगानाथांकडे गेलो. याच वेळी मी मांसाहार वर्ज्य केला आणि नंतर शरीरयंत्रणेत खूपच हलकेपणा व विशुद्धता आल्याची प्रबळ भावना माझ्या अनुभवास आली.

मनाने युरोपीय बनलेल्या माझ्या ठायी त्या काळात देवाविषयी श्रद्धा मुळीच नव्हती. एकदा मी (चांदोदजवळ) कर्नाळीस गेलो. तिथे किती तरी देवळे आहेत. कालीचेही एक मंदिर आहे. त्या मूर्तीचे दर्शन घेताक्षणी तिचे जिवंत सान्निध्य मला जाणवले आणि देवाच्या सान्निध्यावर माझा विश्वास प्रथमच बसला.

मी बंगालमध्ये जाऊन राजकीय काम करू लागलो तेव्हा प्राणायाम नियमितपणे होईनासा झाला आणि मला मोठे दुखणे आले. त्याने मला जवळजवळ नेलेच होते."

काही सुस्पष्ट आध्यात्मिक अनुभव प्राणायामाच्या अभ्यासाला आरंभ करण्यापूर्वीही श्री अरविंदांना आलेले होते. इ.स. 1893 मध्ये इंग्लंडमधून परत येऊन अपोलो बंदरावर पाऊल टाकताक्षणीच एक प्रकारची दिव्य शांती त्यांच्या ठायी अवतरल्याचा निर्देश दुसऱ्या प्रकरणात केलाच आहे.

इ.स. 1903 च्या एप्रिलमध्ये श्री अरविंद यांनी ते काश्मिरात फिरतीवर गेले असताना तख्त-इ-सुलेमान (सॉलोमनचे आसन) या नावानेही प्रसिद्ध असलेल्या शंकराचार्यांच्या डोंगराला भेट दिली. तेथे त्यांना अत्यंत गोचर स्वरूपात शून्य अनंताचा अनुभव आला. आपल्या 'अद्वैत' या कवितेत त्यांनी तो वर्णिला आहेः

सुलेमान-तख्ताच्या त्या मार्गाने गेलोः
मंदिर तेथे आचार्यांचे छोटेसे होते
वैराण गिरीच्या राजीवरती एकाकी ठेले
पृथ्वीचे प्रणयाराधन व्यर्थ जिथे ठरलेः
कालाच्या सीमेवर दिसले अनंत सामोरेः
निराकार एकान्त पसरला होता मजभवते.
बनले होते अद्भुत आणि अनाख्येय सारेः
अजात सत्यचि तेथ ऐकले, विश्ववस्त्र गळले.
नव्हते शिखरहिं, तळही नव्हता, स्तब्ध नित्य ठेलेः
सत्तत्वाचा शब्द एकला शांतिरूप साचा
अज्ञात असे आदी ज्याचा निःशब्दचि वाचाः
दृष्ट वस्तु त्या, श्रुत अथवा क्षण मानुनिया त्याज्य,
अशक्य ज्याते कधी स्पर्शणे शिखरी त्या राज्य
एकाकी निश्चलता, शांती अविकारी शून्य,
मूक शिखेवर, गूढ, गहन करि, प्रकृतीच्या धन्यः

बारीनचे प्लँशेट (प्लँचेट) वर प्रयोग चाललेले असताना, 1901 मध्येच, श्री अरविंदांना काही गूढ चमत्कारांचा साक्षात्कार घडला होता. बारीनने याच संधीला अध्यात्मवादावरचे एक पुस्तक वाचून, प्लँचेट वरील लेखनाचे व टेबलावर टकटक करण्याचे प्रयोग आरंभिले होते. हे प्रयोग अत्यंत वेधक ठरल्याचे पुढील घटनांवरून दिसून येईलः

1. एकदा बारीनने आपले वडील डॉ. कृष्णधन घोष यांना पाचारण केले. ते आलेले असल्याचे उत्तर मिळाल्यावर स्वतःची एखाद्या चिन्हावरून अथवा प्रमाणावरून ओळख

पटवून देण्याविषयी त्यांना सांगितले. आपण बारीनला दिलेल्या सोन्याच्या घड्याळाची त्यांनी आठवण करून दिली. त्या गोष्टीचा बारीनला पूर्ण विसर पडला होता. पण आता त्याला तिचे स्मरण झाले. मग बारीनने त्यांना स्वतःची ओळख पटविणारे आणखी एखादे प्रमाण देण्यास सांगितले. तेव्हा त्यांनी इंजिनीयर देवधर यांच्या घराच्या भिंतीवर एक विवक्षित चित्र असल्याचा उल्लेख केला. पण तसे चित्र शोधाअंती आढळले नाही. स्वतःला कृष्णधन घोषांचा आत्मा म्हणविणाऱ्याला हे सांगितले तेव्हा त्याने अधिक शोध करायला हवा असे उत्तर दिले आणि अधिक पुरतेपणी शोध केल्यावर ते चित्र तिथे असल्याचे परंतु ते चुन्याच्या पांढऱ्या रंगाखाली बुजून गेले असल्याचे त्यांना आढळून आले.

2. दुसऱ्या एका बैठकीला भारताचे महान राष्ट्रवादी नेते लो. टिळक उपस्थित होते. डॉ. कृष्णधन घोषांच्या आत्म्याला पाचारण करून विचारले, "हा पुरुष काय प्रकारचा आहे?" त्याने उत्तर दिले, "ज्या वेळी तुमचे सारे कार्य उद्ध्वस्त झालेले असेल आणि कित्येकांना आपल्या माना खाली घालाव्या लागतील, त्या वेळी हा पुरुष स्वतःची मान ताठच ठेवील." पुढे ते यथार्थ ठरले.

एकदा रामकृष्ण परमहंसाना पाचारण करून प्रश्न विचारले. परंतु ते दीर्घकालपर्यंत गप्पच राहिले. नंतर निघून जाताना ते उद्गारले, "मंदिर उभारा, मंदिर उभारा!"

बडोद्यातला आणखी एक वेधक अनुभव अगदी थोडक्यात टळलेल्या एका अपघातासंबंधी आहे. श्री अरविंद स्वतःच्या गाडीतून कँप रोडकडून शहराकडे चालले होते. अगदी सार्वजनिक उद्यानाजवळच त्यांना अपघाताचा संभव दिसला. तो टाळावा अशी इच्छा होताच एक दैदीप्यमान आत्मा त्यांच्या ठायी आविर्भूत झाला; जणू काही परिस्थिती आटोक्यात आणून तिच्या अंगोपांगावर नियंत्रण ठेवावे यासाठीच तो तिथे आला होता.

दुखण्याचा जोर असताना होणारे प्रार्थनेचे परिणामही त्यांनी वर्णिले आहेः "माझ्या चुलत्यांची मुलगी विषमज्वराने मरायला टेकली होती. आशा सोडून देऊन डॉक्टरांनी सांगितले, "आता आपल्याला एक प्रार्थनाच तेवढी करायला हवी आहे." मग त्यांनी प्रार्थना केली आणि प्रार्थनेनंतर त्यांना त्या मुलीची, शुद्ध परत आल्याचे आढळून आले.

आणखी एक उदाहरण नवसारीस मृत्युशय्येवर असलेल्या माधवरावांच्या मुलाचेः डॉक्टरांनी आशा सोडली होती. औषधोपचार थांबवून देवाची प्रार्थना करण्याची तार माधवरावांनी आपल्या कुटुंबियांना केली. त्यांनी प्रार्थना केली तेव्हा मुलगा दुखण्यातून बरा झाला! हे उदाहरण माझ्या स्वतःच्या माहितीचे आहे. ती तारही माधवरावांनी मला दाखविली होती.

अमरकंटक पर्वतराजीत भटकताना बारीनला पर्वतीय ज्वराने गाठले होते. एका नाग साधूने मंत्र घालून तो हटवला. तेव्हा रोग बरे करण्याचे सामर्थ्य योगामध्ये असल्याचे

प्रत्यक्ष प्रमाण श्री अरविंदांना मिळाले. पाण्याने भरलेला एक पेला घेऊन त्या साधूने मंत्र म्हणत म्हणत त्या पाण्यावर फुली मारली. मग त्याने बारीनला ते पिण्यास सांगितले आणि म्हटले, 'उद्या तुला ताप भरणार नाही.' आणि त्याचा ताप हटलाही.

श्री अरविंदांनी स्वतःच्या पत्नी मृणालिनीदेवी यांना लिहिलेली पत्रे त्यांच्या आध्यात्मिक जीवनावर प्रकाश झोत टाकतात. 30 ऑगस्ट 1905 ला त्यांनी पत्नीला लिहिले होते, 'यातना हा साऱ्या ऐहिक कामनांचा अटळ परिणाम होय.'

माझी तीन वेडं आहेत. पहिलं म्हणजे जे काही सद्‌गुण, नैपुण्य, उच्च शिक्षण व ज्ञान आणि वैभव मला देवानं दिलेलं आहे त्यावर त्याचीच सत्ता आहे असा माझा दृढ विश्वास आहे. कुटुंब पोषणाकरिता आणि अटळ निकडीच्या वस्तूंसाठी अवश्य असेल तेवढंच त्यांतून वेचण्याचा मला अधिकार आहे.

दुसऱ्या वेडानं अलीकडेच माझ्यावर पकड बसविली आहे. ते वेड असंः देवाच्या अस्तित्वाचा साक्षात् प्रत्यय मला यायला हवा, मग तो कोणत्याही साधनांनी असो. क्षणोक्षणी देवाच्या नावाचा अविरत उच्चार करणे, त्याची ज्याच्या त्याच्यासमोर प्रार्थना करणे, आणि आपण किती धर्मनिष्ठ आहो याचे लोकांपुढे प्रदर्शन मांडणे यांतच आजचा सारा धर्म सामावलेला आहेच तो मला नको आहे. ईश्वर अस्तित्वात असेल, तर त्याचे अस्तित्व अनुभवण्याचा, त्याचे सान्निध्य साधण्याचा एखादा मार्ग असलाच पाहिजे. तो मार्ग कितीही खडतर असो, तो अनुसरण्याचा पक्का निर्धार मी केलेला आहे. हा मार्ग स्वतःच्या आत्म्यात, स्वतःच्या अंतरंगात सापडत असतो असा निर्वाळा हिंदू धर्माने दिलेला आहे. तो अनुसरण्याचे सामर्थ्य ज्या नियमामुळे लाभते तोही मला देण्यात आलेला आहे.

तिसरा मूर्खपणा हाः इतरेजन जिथं देशाला एक जड वस्तू मानतात आणि माळ, शेतं, अरण्यं, पर्वत व नद्या म्हणजेच देश असं समजतात, तिथं मी मात्र माझ्या स्वदेशाकडे माता म्हणून पाहतो; अन् माता म्हणूनच त्याची पूजा व भक्ती करतो. आईच्या छातीवर बसून एखादा तिचे रक्त पीत असेल, तर तिचा मुलगा काय करील? सुखासमाधानानं जेवायला का बसेल तो? बायकोमुलांच्या सहवासात आनंद का लुटीत राहील? का आपल्या मातेच्या मुक्ततेसाठी धावून जाणे त्याला अधिक रुचेल? या अधःपतित जातीचे उन्नयन करण्याचे सामर्थ्य माझ्या ठायी आहे हे मी जाणतो. ते सामर्थ्य शारीरिक मात्र नाही. मी लढणार आहे तो तलवारीच्या किंवा बंदुकीच्या बळावर नव्हे, तर ज्ञानाच्या बळावर. योद्ध्याची शक्ती हा काही सामर्थ्याचा एकुलता एक प्रकार नव्हे, ज्ञानाच्या बळावर आधारलेले सत्याचेही सामर्थ्य असतेच की. ही जाणीव माझ्या ठायी नवीन नाही. तिचा उदय अलीकडच्या काळात झालेला नाही. ती घेऊनच मी जन्माला आलेलो आहे, ती माझ्या हाडीमाशी खिळलेली आहे. हे महान कार्य पार पाडण्याकरिताच मला देवाने या पृथ्वीवर पाठविले आहे.

17 फेब्रुवारी 1907 रोजी तिला पाठविलेल्या पत्रात त्यांनी आपल्या दैनंदिन जीवनात परमेश्वरी इच्छेपुढे स्वीकारलेली संपूर्ण शरणागती व्यक्त केली आहेः 'माझं 4 जानेवारीला तुझ्या भेटीस यायचं ठरलं होतं. पण मला आलं नाही. हे माझ्या स्वतःच्या इच्छेने मात्र घडलेले नाही. ईश्वराने नेलं तिथं मला जावंच लागलं. या वेळी मी स्वतःच्या कामासाठी नव्हतो गेलो. अलीकडे माझ्या मनाची वृत्ती पुरती पालटली आहे. याहून अधिक या पत्रात लिहू इच्छित नाही. तू इकडे ये, मग मला काय म्हणायचं आहे ते मी तुला सांगेन. या क्षणी इतकेच सांगता येईल की यापुढे मी स्वाधीन राहिलेलो नाही. परमेश्वर नेईल तिथं मला ते कार्य एखाद्या बाहुलीसारखंच पार पाडावं लागेल.''

पण त्यांची ही शरणागती पूर्णत्वाने बहरलेली पाहायला मृणालिनी देवी जगल्याच नाहीत. अकरा वर्षांनंतर, 1918 च्या डिसेंबरमध्ये, पाँडिचरीच्या वाटेवरच त्या दिवंगत झाल्या.

1907 च्या डिसेंबरमध्ये आपल्याला आपल्या योगसाधनेत साहाय्य करू शकेल अशा कोणाशी तरी आपली गाठ घालून देण्याविषयी श्री अरविंदांनी बारीनला सांगितले. विष्णू भास्कर लेले या महाराष्ट्रीय योग्याचे नाव बारीनच्या कानावर आलेले होते. त्यांनाच त्याने बडोद्यात बोलावून घेतले आणि सरदार मुजुमदारांच्या बडोद्यातील वाड्याच्या सर्वांत वरच्या मजल्यावरील छोट्याशा खोलीत श्री अरविंद, श्री लेले यांजबरोबर तीन दिवस राहिले.

श्री लेल्यांनी त्यांना सांगितले, "खाली बसा. तुम्हाला असे दिसेल की तुमचे विचार बाहेरून तुमच्या अंतरंगांत शिरत आहेत. ते असे शिरण्यापूर्वीच त्यांना परत फेकून द्या." श्री अरविंद खाली बसून पाहू लागले आणि तसेच घडत असलेले पाहून थक्कच झाले. जणू काही त्यांच्या डोक्यातून किंवा डोक्यावरून आत शिरण्यासाठी जवळ येणारा विचार त्यांना प्रत्यक्ष दिसला व जाणवला; आणि तो आत येण्यापूर्वीच ते त्याला प्रत्यक्षपणे बाहेर ढकलूही शकले. तीन दिवसांत —प्रत्यक्षात एकाच दिवसात-त्यांचे मन शाश्वत शांतीने भरून गेले. निःशब्द, निरवकाश व अनंत ब्रह्माचाच तो साक्षात्कार होता. श्री अरविंदांचा योग ज्या चार महान् साक्षात्कारांवर उभारलेला होता त्यातला हा पहिला. या पहिल्या साक्षात्काराला प्रारंभी, हे जग संपूर्णतया आभासमय असल्याच्या अत्यंत प्रबळ अशा जाणिवेची जोड होती. ही जाणीव अलिपूर कारागृहातील दुसऱ्या साक्षात्कारानंतर नाहीशी झाली. सर्व प्राणी आणि अस्तित्वात असलेले वस्तुजात म्हणजेच परमेश्वर व विश्वव्यापी संवित्ती असल्याचा अनुभव त्या साक्षात्कारात आला.

श्री लेले यांजबरोबर ध्यान करून मनाच्या शांत अवस्थेचा साक्षात्कार घडल्यानंतर, 1908 च्या पुढचे लेखन करणे, व्याख्याने देणे, यांसारखे त्यांचे सारे कार्य व साऱ्या चळवळी मनातीत अशा उपमातूनच उद्भवत असत, हे ध्यानात घ्यायला हवे.

शांतिब्रह्माच्या संवित्तीत गढून गेलेल्या अवस्थेतच, 1908 च्या जानेवारीत, ते



मँचेस्टर इंग्लड येथे श्री अरविंद, 1883



बडोदा येथे श्री अरविंद, सुमारे 1904



पाँडिचरी येथे श्री अरविंद, सुमारे 1920



फ्रान्समध्ये श्री माताजी, सुमारे 1897



जपानमध्ये श्री माताजी, 1918



पाँडिचरी येथे श्री माताजी, 1969



श्री माताजी भारताच्या तीन पंतप्रधानांसमवेत—श्री जवाहरलाल नेहरू, श्रीमती इंदिरा गांधी, श्री लाल बहादूर शास्त्री आणि तामिळनाडूचे मुख्यमंत्री श्री कामराज मध्यभागी, 1955



श्री अरविंदांच्या समाधीजवळ ध्यानमग्न आश्रमवासी



श्री अरविंद आंतरराष्ट्रीय शिक्षण बालवाडीतील मुले



शिक्षण केंद्रातील क्रीडा



श्री अरविंद सोसायटी वार्षिक सभा


ऑरोव्हिल येथील मातृमंदिर


श्री अरविंदांचे प्रतीक


श्री माताजींचे प्रतीक


श्री अरविंद सोसायटीचे प्रतीक


ऑरोव्हिल (श्री अरविंद नगरी) चे प्रतीक

मुंबईस गेले. या अवस्थेत त्यांच्या मनात एकदेखील विचार शिरत नसे. तिथे त्यांना नॅशनल युनियनमध्ये व्याख्यान द्यायचे होते. आणि त्यांनी श्री. लेले यांना विचारले, "मी काय करू?" श्री. लेले यांनी त्यांना सांगितले, सभेला जा आणि श्रोत्यांना नारायण मानून नमस्कार करा, मग एक अज्ञात वाणी भाषण करील." भाषण खरोखरी तसेच स्फुरले!

श्री. लेले यांचा निरोप घेण्यापूर्वी श्री अरविंदांनी उपदेश देण्याची विनंती त्यांना केली. श्री लेले त्यांना सविस्तर उपदेश देत असताना आपल्या हृदयात स्फुरलेल्या मंत्राची माहिती श्री. अरविंदांनी त्यांना दिली. श्री. लेल्यांनी त्यांना सांगितले, "तुला ज्याने हा मंत्र दिला त्याच्यावरच सर्वस्वी विसंबून राहा. अधिक उपदेशाची काहीही आवश्यकता नाही." श्री अरविंदांनी स्वतःला आपल्या अंतरातील दैवी गुरूच्या हाती पुरतेपणी सोपविले. ते अशा रीतीने कित्येक वर्षांनंतर त्यांनी लिहून ठेवले. "एकामागून एक अशी अनुभवाची जोड मिळवीत, अधिकाधिक उन्नतिप्रत पोहोचत, शेवटचे स्थान म्हणून कुठेही न थांबता, उन्मनीचा कवडसा दिसेपर्यंत, पुढे पुढेच जात राहण्याची आज्ञा माझ्या अंतरातील दैवी गुरूने मला केली आहे."

अलिपूर कारावासातल्या दुसऱ्या साक्षात्काराचे वर्णन त्याच्या उत्तरपाड्यातील प्रसिद्ध वक्तव्यात आले आहेः

"ईश्वराने माझ्या बंदिपालांची हृदये मजकडे वळविली आणि काराध्यक्ष असलेल्या इंग्रजाला त्यांनी सांगितले, 'एकान्तवासाच्या शिक्षेत त्यांना क्लेश होत आहेत. त्यांना सकाळ-संध्याकाळ अर्धा अर्धा तास निदान त्यांच्या कोठडीबाहेर तरी फिरू द्या.' तेव्हा तशी व्यवस्था झाली. आणि ईश्वराचे सामर्थ्य फिरून माझ्या ठायी प्रविष्ट झाले ते तसे फिरत असतानाच. मला मानवापासून दूर, एकान्तात ठेवणाऱ्या त्या कारागृहाच्या भिंतींनी बंदिस्त केलेले नसून, आपल्याला वेढून टाकले आहे ते तर वासुदेवाने. मी आपल्या कोठडीसमोर झाडाच्या फांद्यांखालून हिंडत होतो, पण ते झाड नसून वासुदेव असल्याचे मी जाणून होतो. मला त्या ठिकाणी दिसला तो तिथे उभा राहून मजवर आपली पाखर घालणारा श्रीकृष्ण. आपल्या कोठडीच्या मोकळ्या दाराकडे, दाराचे काम भागवणाऱ्या गजांच्या जाळीकडे मी पाहिले आणि फिरून मला वासुदेवच दिसला. नित्य पहारा देणारा आणि माझे संरक्षण करणाराही नारायणच होता. मला गादी म्हणून दिलेल्या जाड्याभरड्या घोंगड्यावर मी निजलो असता माझ्या दैवी सुहृदाचे माझ्या ईश्वरी प्रियसख्याचे, श्रीकृष्णाचे बाहू मला वेढून टाकीत असल्याचा प्रत्यय मला आला. ईश्वराने मला दिलेल्या अधिक सखोल साक्षात्काराचा हा पहिला उपयोग... कारागृहातले बंदी, चोर, खुनी, ठक, यांजकडे मी पाहिले, तो मला वासुदेवच दिसला. त्या तमोग्रस्त आत्म्यांमध्ये आणि दुरुपयुक्त देहांतही मला तो नारायणच आढळला."

अलिपूर कारागृहात ध्यानधारणा करीत असतानाच ते आपल्या दुसऱ्या दोन साक्षात्कारांच्या मार्गाला लागले होते. पहिला साक्षात्कार, अचल आणि गतिमान ब्रह्म दोन

पैलू असलेल्या परम तत्वाचा होता आणि दुसरा उन्मनीप्रत नेणाऱ्या संवित्तीच्या उच्चतर स्तरांचा होता. कारागृहात त्यांना काही वेधक अनुभव आले होते. ते त्यांनी वेळोवेळी वर्णिले आहेत. या अनुभवांतला एक क्रोधाविषयीचा होता. त्यासंबंधी त्यांनी असे लिहिले आहेः

"दुसऱ्या एका प्रसंगी (1908), मी अभियुक्त आरोपी म्हणून अलिपूर कारागृहात होतो तेव्हा माझ्या क्रोधाचे पर्यवसान एका भीषण अनर्थात झाले असते पण सुदैवाने ते टळले. कोठडीत प्रवेश करण्यापूर्वी काही वेळ तेथील बंदीना बाहेर थांबावे लागे. आम्ही तसे थांबलेलो असताना तिथला स्कॉच कक्षपाल मजजवळ आला आणि त्याने मला ढकलले. माझ्याभोवतालचे युवक अत्यंत क्षुब्ध झाले आणि मी दुसरे काहीच केले नाही, पण त्याच्याकडे असा काही दृष्टिक्षेप केला की तत्काळ पळून जाऊन त्याने बंदिपालाला बोलावून आणले. तो क्रोध सांसर्गिक ठरला आणि चढाई करण्यासाठी त्या तरुणांनी गर्दी केली. वृत्तीने काहीसा धार्मिक असलेला तो बंदिपाल आला, तेव्हा कक्षपाल त्याला म्हणाला, 'त्याने माझ्याकडे अवज्ञामूलक दृष्टिक्षेप केला.' बंदिपालाने मला विचारल्यावरं मी सांगितले, 'असल्या वागवणुकीची मला कधीच सवय नव्हती.' बंदिपालाने त्या साऱ्या गटाला शांत केले आणि निघून जाताना तो उद्‌गारला 'आपल्यातल्या प्रत्येकालाच स्वतःचा सूळ स्वतः वाहून न्यावा लागतो!"

श्री अरविंदांनी उल्लेखिलेला दुसरा अनुभव आहे कलेचे रसग्रहण करणाऱ्या शक्तीसंबंधीचाः

"मला शिल्पकलेची थोडीशी माहिती होती. पण चित्रकलेच्या क्षेत्रात मात्र मी अनभिज्ञच होतो. एक दिवस, अलिपूर कारागृहात ध्यान करीत असताना मला अनपेक्षितपणे कोठडीच्या भिंतीवर काही चित्रे दिसली. आणि अहो, काय आश्चर्य पाहा! माझ्या ठायी असलेली कलारसिक दृष्टी एकदम उघडली आणि चित्रकलेविषयी सारे काही अर्थात् तिची विशेष महत्वाची बाजू सोडून— मला कळू लागले. पण योग्य त्या तांत्रिक ज्ञानाची मला वाण असल्याकारणाने (रसिकता) व्यक्त कशी करावी हे मात्र मला नेहमीच कळते असे नाही. पण ही वाण सूक्ष्म व जाणत्या रसग्रहणाच्या बाबतीत कधीच आड आली नाही. म्हणजे पाहिलंत ना? योगसाधनेला साऱ्या गोष्टी शक्य असतात!"

लघिमा सिद्धीचा (उत्थापनाचा) अनुभवदेखील त्यांना अलिपूर कारागृहातच आला. तो त्यांनी पुढील शब्दांत वर्णिला आहेः

"मी प्राणमय पातळीवर अत्यंत कडक साधना करीत होतो आणि अगदी एकाग्र होऊन गेलो होतो. माझ्या मनाला जिज्ञासा वाटली, लघिमेसारख्या सिद्धी संभवतात का? आणि स्नायूचे बळ लावून मला तो कधीच जमला नसता असा काही प्रकाराने मी एकाएकी वर उचलला गेलेला मला आढळलो! माझ्या शरीराचा केवळ एक अंशच भूपृष्ठाला किंचित् लागलेला होता. माझं बाकीचं सारं अंग भिंतीसमोर उचललं गेलं होतं.

तशी इच्छा असती तरी, मला माझा देह स्वाभाविकपणे तसा (तोलून) धरता आला नसता आणि आपला देह कसलेच परिश्रम केल्याविना आपोआपच तसा अधांतरी तरंगत राहिल्याचं मला आढळून आलं.

अलिपूर कारागृहातला आणखी एक अनुभव विवेकानंदांसंबंधी होताः

"कारागृहातल्या माझ्या एकान्त ध्यानात विवेकानंदांची माझ्याशी संभाषण करणारी वाणी मला सतत दोन आठवडे ऐकू येत असे आणि त्यांची उपस्थितीही जाणवत असे. ती वाणी आध्यात्मिक अनुभवांच्या एका विशिष्ट व सीमित पण अत्यंत महत्त्वाच्या अशा क्षेत्राविषयी बोलत राही आणि तिला त्या विषयावर सांगायचं होतं ते संपवून ती थांबली!"

त्यांना तिरस्काराचाही असाच अनुभव आला होता.

"लहान असताना मला स्वतःला क्रूरतेच्या कोणत्याही कृतीचे वर्णन, ती करणाऱ्या व्यक्तीविषयी मनात तिटकारा किंवा द्वेषभाव वाटल्यावाचून, ते वाचता येत नसे. ढेकूण म्हणा किंवा डास म्हणा, असा एखादा कीटक मी मारू शकत नसे; माझा अहिंसेवर गाढ विश्वास होता म्हणून नव्हे, तर माझ्याठायी दैवी करुणा आणि मानसिक उद्वेग वसत असे म्हणून. कालांतराने माझ्या मनाचा कसला आक्षेप उरलेला नसूनदेखील मी कोणत्याही प्राण्याला उपद्रव देऊ शकत नसे, कारण माझा देहच मुळी ती कृती फेटाळून लावी!

कारागृहात असताना प्रारंभीचे काही दिवस मानसिक दृष्ट्या माझा सर्वतोपरींनी छळ केला गेला. मला स्वतःच्या डोळ्यांदेखत अनंत यातनांची दृश्ये पाहावी लागत आणि मग ही वृत्ती नष्ट झाली."

श्री अरविंदांच्या केसांवर अशी काही असाधारण तकाकी असे की, ते केसांना तेल लावतात असाच त्यांच्या कारावासातील साथीदारांचा सर्वसाधारण समज होता. पण प्रत्यक्ष त्यांनाच विचारता, त्यांनी पृच्छकांना तसे काही नसल्याचा निर्वाळा दिला. त्यांच्या केसांचे तेज हे पूर्णतया साधनेचेच फलित होते.

या अवधीत त्यांच्या जीवनविषयक दृष्टिकोनात आमूलाग्र परिवर्तन घडून आले. आध्यात्मिक शक्ती व उत्साह आणि ईश्वरी मार्गदर्शन यांची जोड स्वतःच्या जीवनकार्याला मिळावी म्हणून त्यांनी योगाचा मार्ग अवलंबला होता. पण आता त्यांच्या आंतर आध्यात्मिक जीवनाचे आणि साक्षात्काराचे परिणाम आणि व्याप्ती निरंतर वृद्धिंगत होऊन अधिकाधिक वितृस्त क्षेत्र आक्रमू लागली आणि त्यांनी त्यांना पुरते झपाटले; त्यांचे जीवनकार्य हाही त्यांचाच अंश व परिणाम होऊन गेला. हे कार्य राष्ट्राची सेवा आणि विमोचन यांहून किती तरी अधिक व्यापक असून ते पूर्वी केवळ ओझरतेच दिसलेल्या, परंतु विश्वव्यापी आकांक्षेशी निगडित असलेल्या व उभ्या जगावर परिणाम घडविणाऱ्या अशा ध्येयावर केंद्रित झालेले होते. सारे जीवनच योग होय हे आता श्री अरविंदांच्या संदर्भात स्पष्ट झाले होते.

कारागृहात मिळालेला आदेश त्यांनी नुसता आपल्या भाषणांतूनच घोषित केला

नाही, तर 'कर्मयोगिन्' व 'धर्म' नावाची जी दोन साप्ताहिके बंगालीत प्रकाशित करीत असत, त्यांतूनही तो त्यांनी प्रसृत केला. ही दोन्ही साप्ताहिके लोकप्रिय होती आणि देशात बऱ्याच दूरपर्यंत त्यांचे वितरणही होत असे.

'कर्मयोगिन्' मध्ये श्री अरविंदांनी लिहिले, "आता आम्ही आपल्या पुढे ठेवलेले कार्य केवळ यांत्रिक नव्हे, तर नैतिक आणि आध्यात्मिक आहे. आमचे उद्दिष्ट केवळ शासनाचे स्वरूप पालटून टाकणे हे नसून, राष्ट्राची उभारणी करणे हे आहे. राजकारण हा त्या कर्तव्याचाच केवळ एक भाग आहे. आम्ही आपल्याला वाहून घेणार ते केवळ राजकारणाला नव्हे, किंवा नुसत्या सामाजिक समस्यांना नव्हे, अथवा एकेकट्या धर्मशास्त्राला, साहित्याला वा विज्ञानालाही नव्हे. आम्ही तर या साऱ्यांचीच गणना धर्मात-जो विश्वधर्म ही असल्याची आमची श्रद्धा आहे- त्या राष्ट्रधर्म नामक सलग प्रणालीत करतो. या जीवनाची एक अत्यंत प्रभावी अशी नियमावली आहे, त्याच्या विकासाचे एक महान तत्त्व आहे, आध्यात्मिक ज्ञान व अनुभव यांचा एक निधी आहे आणि त्यांचा रक्षणकर्ता, आदर्श आणि प्रचारक म्हणून विधी सतत भारताची योजना करीत आला आहे. हा धर्म सनातन व शाश्वत असा धर्म आहे. आपण परत वळून जीवन व शक्ती यांचे मूलस्रोत स्वतःच्या भविष्यासाठी तो परत प्राप्त करून घ्यायला हवा. प्रथम स्वतःचे यथार्थस्वरूप जाणून घेऊन प्रत्येक गोष्टीला भारताच्या प्रकृतीनुसार व शाश्वत जीवनाच्या व्यवहारानुसार आकार देणे हे आपले कर्तव्य आहे. आमची अशी श्रद्धा आहे की आज भारताचे उत्थान घडून येत आहे ते योग हेच मानवी जीवनाचे ध्येय बनावे यासाठी. स्वतःचं स्वातंत्र्य, ऐक्य आणि माहात्म्य प्राप्त करून घेण्याची शक्ती भारताला योगातूनच मिळेल. तसेच ते टिकवून ठेवण्याची क्षमताही योगानेच लाभेल. आम्हाला भविष्य दिसते आहे ते आध्यात्मिक क्रांतीचे आणि भौतिक क्रांती ही तिची नुसती छाया किंवा प्रतिक्षिप्त क्रियाच असेल.

आणि पुन्हा, मानवजातीला ज्या समस्यांनी गांजले आहे त्या समस्त अंतरंगाचे राज्य जिंकल्यानेच केवळ सुटू शकतील."

'बाजी प्रभू', 'एपिफनी (ईश्वराचा अवतार) आणि इतर कविता' ही काव्ये, तसेच 'राष्ट्रीय शिक्षणाची पद्धती', 'भारताची बुद्धिमत्ता,' 'कलेचे राष्ट्रीय मूल्य', 'कर्मयोग्याचे ध्येय,' हे निबंध आणि 'ईश,' 'केन,' 'कठ,' या उपनिषदांची व कालिदासाच्या 'ऋतुसंहारांचे' आणि बंकिमचंद्रांच्या 'आनंदमठाचे' अशी इंग्रजी भाषांतरे हे अरविंदांचे सारे साहित्य कर्मयोगिन्च्याच निरनिराळ्या अंकातून प्रसिद्ध झाले होते. हे साप्ताहिक व्यापक क्षेत्रातील विषयांचा समाचार घेत असे आणि त्या साऱ्यानाच आध्यात्मिक दृष्टिकोन लागू करीत असे.

# 7

# आदेश

ब्रिटिश लोकांचे स्वभाव व गुणविशेष आणि त्यांच्या राजकीय मनोवृत्तीचे वळण यांचा श्री अरविंदांनी अभ्यास केलेला होता. 'भारतीय जनतेने चालविलेल्या आत्मविमोचनाच्या कोणत्याही प्रयत्नाला ते विरोधच करतील आणि फारच झालं तर आपल्या साम्राज्याच्या वर्चस्वाला दुर्बळं करून टाकणार नाहीत अशाच प्रकारच्या सुधारणांना ते अगदी सावकाशपणे मान्यता देतील!' पण असं असूनही ब्रिटिश हे अगदी टोकापर्यंत निर्दयपणे हटून बसणाऱ्या जातीतले नव्हेत असा त्यांना विश्वास असे. "प्रतिकार आणि बंडखोरी सर्वत्र आणि अव्याहतपणे चालू राहिल्याचे त्यांना आढळून आले, तर अगदी सरतेशेवटी, आपल्या साम्राज्यातले जमेल तेवढे वाचविण्याच्या दृष्टीने ते तडजोडीचीही खटपट करतील. किंवा अगदीच कडोविकडीच्या प्रसंगी, स्वातंत्र्य स्वतःच्या हातांतून बलात्काराने हिसकावून घेतले जाण्यापेक्षा ते आनंदाने देऊन टाकणेच ते इष्ट मानतील." त्यांच्या या अनुमानांना पुढे घटलेल्या घटनांनी यथार्थ ठरविलेले आहे.

लॉर्ड कर्झननंतर, इ.स. 1905 मध्ये, लॉर्ड मिंटो हे भारताचे गव्हर्नर जनरल झाले. लॉर्ड मिंटो परंपरावादी (कॉन्झर्वेटिव्ह), तर भारतमंत्री जॉन मोर्ले हे उदारमतवादी (लिबरल) होते. लॉर्ड मिंटोना मोर्ले यानी लिहिलेले एक पत्र इंग्लिश व्यक्तित्वाचे निदर्शक आहे. त्यात लिहिले आहे, "पण हिंदुस्तानच्या शासनकर्त्यांना आजच्या परिस्थितीकडे डोळेझाक करता येणार नाही. राजकीय वातावरण पार पालटून गेलेले आहे; आपल्यापुढे असलेल्या समस्या डावलता येण्याजोग्या नाहीत आणि त्यांचे उत्तर शोधण्याचा प्रयत्न आपल्याला करावाच लागणार आहे. आणि त्याला आपल्याकडूनच प्रारंभ व्हावा हे मला सर्वांत महत्त्वाचे वाटते. या देशातल्या चळवळीमुळे किंवा स्वदेशातल्या दडपणापायी हिंदुस्तानच्या राज्यकर्त्यांना (या गोष्टी) करणे भागच पडले, असे भासण्याच्या परिस्थितीत आपण सापडता कामा नये. स्वतःची परिस्थिती ओळखून, वैयक्तिक अनुभव आणि भारतील दैनंदिन जीवनाशी निकटचा संबंध यामुळे आपणास जी मतं बाळगण्याचा अधिकार प्राप्त झालेला आहे ती (इंग्लंडच्या) राजेसाहेबांच्या समोर मांडण्यासाठी आपणच प्रथम पुढे झाले पाहिजे."

बंगालच्या नायब गव्हर्नरांकडून लॉर्ड मिंटोंना गेलेल्या पत्रात शासनाची त्या

काळातली श्री अरविंदांविषयीची भूमिका प्रतिबिंबित झालेली आहे.

"राजद्रोही सिद्धांत फैलावण्याच्या संबंधात, बंगाल्यातील किंवा कदाचित उभ्या भारतातील अन्य कोणत्याही व्यक्तीहून मी अरविंदांना किती तरी अधिक प्रमाणात दोषी मानतो." लॉर्ड मिंटोंचेही मत तसेच बनले असणार. कारण त्यांनी जॉन मोर्लेना लिहिले, "फिरून एकदा मला केवळ इतकेच सांगता येईल...आपण विचारात घ्यायलाच हवा असा सर्वांत भयंकर पुरुष हाच आहे."

बारिसालमधील प्रत्येक परिषदेला उपस्थित राहून, श्री अरविंदांनी व्याख्याने दिली. इकडे त्यांना दूर हाकलायचा निर्धार करून शासनाने त्यांना देशातून निष्कासित करण्याचे ठरविले होते पण या योजनेची माहिती स्वामी विवेकानंदांच्या आयरिश शिष्या, भगिनी निवेदिता यांना मिळालीच. त्या स्वतः क्रांतिवादी असून, श्री अरविंदांच्या कार्यात त्यांच्याशी संपर्कही राखून असतच. त्या दोघांची पहिली भेट 1902 मध्ये बडोद्यात झाली, परंतु या भेटीपूर्वीही त्या त्यांना कालीचे उपासक, म्हणजेच क्रांतिकार्य चालू ठेवण्यासाठी तेथे पाच सदस्यांचे एक मंडळ संघटित केले गेले, तेव्हा भगिनी निवेदिताही त्याच्या सदस्या होत्या. आता श्री अरविंदांनी ब्रिटिश हिंदुस्तान सोडून निघून जावे आणि बाहेरूनच कार्य करीत राहावे अशी सूचना त्यांनी केली. पण अरविंदांचा उपाय निराळाच होता. 1909 च्या डिसेंबरमधील दिनांक 25 ला त्यांनी आपल्या देशबांधवांना उद्देशून एक अनावृत्त पत्र कर्मयोगिनमध्ये प्रसिद्ध केले त्यात त्यांनी स्वतःच्या संभाव्य निष्कासनाचा स्पष्ट निर्देश केला होता आणि प्रस्तुत पत्र हे आपले शेवटचे मृत्युपत्र किंवा प्रतिज्ञापत्रक असल्याचे सांगून ते देशाला अर्पण केले होते. यामुळे निष्कासनाची कल्पना बारगळेल असा त्यांना विश्वास होता आणि तो खराही ठरला.

पण तसे झाले म्हणून आपल्या योजना सहजासहजी व्यर्थ ठरू द्यायला मात्र शासन सिद्ध नव्हते. 'कर्मयोगिन्' च्या कार्यालयाची झडती घेण्याचा व श्री अरविंदांना अटक करण्याचा शासकांचा हेतू त्यांना समजला होता. तेव्हा ते आणखी काहीजणांसह 'कर्मयोगिन्च्या कार्यालयातच होते. कार्याच्या पुढील दिशेविषयी विचारविनिमय करण्यात आला. रामचंद्र मुजुमदार लढा देण्यास उत्सुक होते. श्री अरविंद स्वतःच्या पुढच्या खेळीचा विचार करीत होते. त्यांनी स्वतःच लिहून ठेवले आहे, मला एक आदेश मिळाला, "नाही, चंद्रनगरला जा," असे एका वाणीने मला आकाशातून सांगितलेले मी एकाएकी ऐकले. कारागृहातून सुटल्यापासून मला दैवी वाणी ऐकू येत असे आणि त्या दिवसांत मी तिचे आदेश आक्षेप न घेता पाळीत असे.

मग त्यांनी थोडादेखील वेळ गमावला नाही. दहा मिनिटांत गंगातीर गाठून ते फ्रेंच भारतातल्या चंद्रनगरास जाणाऱ्या नौकेवर चढले. चंद्रनगरात ते असे गुप्तपणे लपून राहिले होते ते 1910 मध्ये. शत्रूला सापडू नये म्हणून ते आपले निवासस्थान वेळोवेळी पालटीत. त्यांची सर्व व्यवस्था लागण्यास चंद्रनगरचे एक अग्रेसर नागरिक, मोतीलाल रॉय

हेच साधनीभूत होते. आपल्या अनुपस्थितीत कर्मयोगिनूच्या संपादनाचे कार्य हाती घेण्याचा संदेश श्री अरविंदानी भगिनी निवेदिता यांना धाडला होता.

अशा प्रकारचा ताण पडत असून देखील श्री अरविंदानी आपली साधना मात्र अत्यंत उत्कटतेने चालू ठेवली होती. ध्यानसमयी त्यांना तीन वा चार देवतांच्या आकृती दिसत. कालांतराने पांडिचरीत वेदाध्ययनास प्रारंभ केल्यावर त्या इला, भारती, मही आणि सरस्वती असल्याचे त्यांनी ओळखले.

पुढे काय करावयाचे याविषयी श्री अरविंद विचारात पडले होते. काही स्नेह्यांनी त्यांना फ्रान्सला जाण्याची सूचना केली होती पण फिरून आदेश आला— या वेळी पाँडिचरीला जाण्याचा. उत्तरपाड्याच्या काही क्रांतिवादी युवकांनी वल्हविलेल्या, एका नौकेतून श्री अरविंद, 31 मार्च 1910 ला कलकत्यास परतले. तेथे ज्योतींद्रनाथ मित्तर हे नाव धारण करून, ते डुप्ले या आगबोटीवर चढले. 1 एप्रिल 1910 च्या पहिल्या प्रहरी, ती आगबोट पाँडिचरीकडे निघाली.

# 8

# पाँडिचरीत

भारताच्या आग्नेय किनाऱ्यावर वसलेल्या पाँडिचरीचा आध्यात्मिक इतिहास अत्यंत प्राचीन आहे. अगस्त्य ऋषी उत्तरेकडून आले, ते पाँडिचरीत स्थायिक झाले असे परंपरा सांगते. त्या काळात ती नगरी वेदपुरी या नावाने प्रसिद्ध होती. या परंपरेला जोव्हो-दे ब्रोई या फ्रेंच पुरातत्ववेत्याने मान्यता दिलेली आहे.

4 एप्रिल 1910 ला दुपारी चार वाजता, श्री अरविंद पाँडिचरीस पोहोचले. चार या अंकाला भौतिकात 'उन्मनीचा साक्षात्कार' असा गूढार्थ आहे.

या वेळेपासून श्री अरविंदांची योगसाधना वाढत्या तन्मयतेने होऊ लागली. सार्वजनिक राजकीय चळवळीत भाग घेण्याचे त्यांनी सर्वतोपरीने सोडून दिले; आणि आता पुनरुज्जीवित झालेल्या भारतीय राष्ट्रसभेच्या बैठकीचे अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंतीही त्यांनी अनेक वेळा नाकारली. ज्या क्रांतिकारक सेनेचे त्यांनी एके काळी नेतृत्व केले होते तिच्याशी त्यांनी एकदोन व्यक्तींच्या मध्यस्थीने काही काळ संपर्क टिकविला होता, पण कालांतराने तोही तोडला. त्यांना घडणारा भवितव्यतेचा साक्षात्कार जसजसा अधिकाधिक स्पष्ट होत गेला, तसतसा भारताचे भावी स्वातंत्र्य निश्चित झालेले असल्याचा त्यांना भरवसा वाटू लागला. त्याच्या जोडीला स्वतःसमोर असलेल्या आध्यात्मिक कार्याची महत्ताही त्यांना अधिकाधिक स्पष्ट दिसू लागली; आणि यापुढे आपल्या साऱ्या शक्ती त्यातच मुरवाव्या लागणार असल्याचीही त्यांना जाणीव झाली.

श्री अरविंद ज्याला उन्मनी म्हणत त्याची अंतरीची खूण स्वामी विवेकानंदांच्या आत्म्याने त्यांना अलिपूर कारागृहात असतानाच देऊन ठेवली होती. प्रत्येक वस्तूत ही ईश्वरी सत्याची संवित्तीच कशी कार्यान्वित झालेली असते याची साक्ष त्यांना या अंतरीच्या खुणेच्या अनुषंगाने पटली. या संवित्तीने अवतीर्ण होऊन पृथ्वीवर परिवर्तन घडवून आणणे मानवतेच्या कल्याणासाठी आवश्यक होते. खरे सांगायचे तर मानवता ज्या कष्टप्रद विप्लवात बुडून गेली होती त्यातून तिला बाहेर काढण्याचा तोच एकुलता एक मार्ग होता. कालांतराने बारीनजवळ त्यांनी पुढील मीमांसा केली: "माणसाला वर चढता आले नाही, म्हणजेच त्याला उन्मनीची पातळी गाठता आली नाही, तर विश्वाचे अंतिम कोडे त्याला क्वचितच उलगडता येईल. मग जगाची समस्या सुटायचीच नाही."

पाषाणातून वनस्पतीत, वनस्पतीतून पशूत आणि पशूतून मानवात, अशी चढती उत्क्रान्ती निसर्गात चालू असते, असे श्री अरविंदाचे मत होतेच पण चालू क्षणाला माणूस या उन्नतीची शेवटची अवस्था मानू लागतो आणि स्वतःहून श्रेष्ठ असे या पृथ्वीवर काहीच असू शकत नाही असा विश्वास बाळगू लागतो. त्यात तो चुकतोच आहे. देहस्वभावाच्या दृष्टीने अजूनही तो पशूच असतो-विचार करणारा आणि बोलणारा पशू-पण शेवटी महत्त्वाच्या सवयी आणि सहज प्रवृत्ती यांच्या दृष्टीने पशूच. निसर्गाला अशा अपूर्णतेत समाधान लाभणार नाही हे उघडच आहे. माणसाचे पशूशी जे नाते असते तेच नाते माणसाशी सांगणारा प्राणी उत्क्रांत करण्याची तिची खटपट असते. या प्राण्याची संवित्ती मन असलेला प्राणी व त्याचे अज्ञानाचे दास्य यांच्यापासून किती तरी वर चढत जाते."

हे सत्य मानवाला शिकविण्यासाठी श्री अरविंद धरातली अवतीर्ण झाले. त्यांनी पुढील शिकवण दिलीः "मनुष्य प्राणी हा मध्यावस्थेतला असून तो मानसिक संवित्तीने जगत असतोच पण त्याला नवी संवित्ती ईश्वरी सत्याची संवित्ती-प्राप्त करून घेणे शक्य असते आणि पूर्णपणे सुसंवादी, सत्प्रवृत्त आणि सुंदर, आनंदमय व पूर्णत्वाने ज्ञानमय असे जीवन व्यतीत करण्याचीही क्षमता त्याच्याजवळ असते." श्री अरविंद या संवित्तीलाच 'उन्मनी' म्हणत व तिची स्वतःच्या ठायी प्राणप्रतिष्ठा करण्यासाठी आणि तिचा साक्षात्कार साधण्यात आपल्याभोवती जमा झालेल्यांना सहाय्य करण्यात त्यांनी आपला सारा काळ वेचला.

ज्याच्या द्वारा योगसाधन करणाऱ्या प्रत्येकाला सर्वांतर्यामी असलेल्या एकमेव आत्म्याचा शोध लावता येईल आणि मानवी स्वभावात परिवर्तन घडवून आणून त्याला दैवी बनविणारी मानसिक संवित्तीहून उच्चतर अशी आध्यात्मिक किंवा उन्मनी संवित्ती विकसित करून घेत येईल तो आत्म्याचा आंतर विकास साध्य करून घेणे हा त्यांच्या योगाचा उद्देश्य होता.

श्री अरविंदांना आता इहलोकाविषयी किंवा भारताच्या भवितव्यतेविषयी आस्था राहिलेली नसून, ते आध्यात्मिक अनुभवाच्या काही उच्चतर अवस्थेत निवृत्त होऊन राहिले आहेत असे पुष्कळ लोकाना वाटे; पण त्यांच्या स्थितीचा हा अर्थ खरा नव्हता. तिचा असा अर्थ असणे शक्यच नव्हते. केवळ ईश्वरी साक्षात्कार जोडून आध्यात्मिक संवित्तीप्रत पोहोचणे एवढेच त्यांच्या योगाचे मूलभूत सूत्र नव्हते, तर जगातल्या सार्‍या क्रिया या आध्यात्मिक संवित्तीच्या परिघात सामावून घेऊन जीवन ब्रह्माधिष्ठित करावयाचे आणि त्याला आध्यात्मिक आशयाची जोड द्यावयाची असा त्यांचा उद्देश्य होता. विरागी जीवनातही श्री अरविंदांचे जगात आणि भारतात चाललेल्या सार्‍या घडामोडींकडे बारीक लक्ष असे आणि अवश्य वाटेल तेव्हा तेव्हा ते त्यांत सक्रिय हस्तक्षेपही करीत असत; पण तो नुसता आध्यात्मिक शक्तीने आणि मूक आध्यात्मिक कार्याने.

पाँडिचरीस पोहोचल्यापासून 1910 च्या ऑक्टोबरपर्यंत श्री अरविंद कोम्टी चेट्टी रस्त्यावरील शंकर चेट्टींच्या घरात, त्यांचे पाहुणे म्हणून राहात असत. पाँडिचरीस आले असताना स्वामी विवेकानंदही या घरात राहिले होते. पुढे श्री अरविंदानी आपले वास्तव्य सुंदर चेट्टी यांच्या मालकीच्या घरात हालविले.

कित्येक वर्षांपूर्वी, नागै जापता या दक्षिण भारतीय योग्याने श्री अरविंदांच्या आगमनाचे भविष्य वर्तवून ठेवलेले होते. आपण आता लवकरच देह ठेवणार हे जाणून, या योग्याने आपल्या शिष्यांना भेटीसाठी बोलावून घेतले. कडैलमचे त्या वेळचे जमीनदार, (भूम्यधिकारी), के.वी.आर. अय्यंगार यांनी त्यांना विचारले, "भावी काळात मी आध्यात्मिक मार्गदर्शन कोणापासून घ्यावे?" गुरू उत्तरले, "उत्तरेकडून एक महान योगी येणार आहेत, त्यांच्याकडून." त्यांनी आणखीही सांगितले, "दक्षिणेस हे महान योगी आसरा घेण्यासाठी येतील आणि ते आपल्या आगमनापूर्वी, तीन गोष्टी घोषित करतील." आपल्या पत्नी मृणालिनी देवी यांच्या पत्रात श्री अरविंदांनी आपल्या आयुष्यातल्या तीन महत्त्वाकांक्षांचा-त्यांच्या शद्वांत आपल्या वेडांचा-उल्लेख केला होता याची आठवण या संदर्भात होईल. नागै जापतांनी श्री अरविंदांचाच निर्देश केलेला असल्याची साक्ष पटवून के.व्ही. आर. अय्यंगार त्यांच्या भेटीस गेले. के. के.व्ही.आर. अय्यंगार यांच्या समवेत, पुढे तामिळ साहित्यिकांच्या जगात 'वा-रा' म्हणून प्रसिद्धीस आलेले रामस्वामी अय्यंगार होही होते. ते येण्यापूर्वी श्री अरविंदांनी त्यांना आपल्या एका साक्षात्कारात पाहिले होते, पण ते प्रथम गेले होते. तशा तुळतुळीत गोटा केलेल्या वैष्णवाच्या नव्हे, तर पुढे, पाँडिचरीतील वर्षभराच्या वास्तव्यानंतर त्यांनी धारण केलेल्या जटाधारी साधकाच्या रूपात.

के.व्ही.आर. अय्यंगार यांनी श्री अरविंदांना आर्थिक सहाय्य केले आणि 'योगिक साधन' हा त्यांच्या ग्रंथही प्रसिद्ध केला. प्रस्तुत ग्रंथ हे स्वतःप्रवृत्त (ऑटोमॅटिक) लेखनातील प्रयोगांचे फलित होते. या ग्रंथाचे लेखन चालू असताना राजा राममोहनराय यांच्यासारखी भासणारी एक आकृती दिसत असे. बडोद्यात बारीनने स्वतःप्रवृत्त लेखनाचे काही असाधारण स्वरूपाचे प्रयोग केले होते. आणि अशाच प्रकारच्या लेखनाचा स्वतः अभ्यास करून, त्यामागील रहस्य काय आहे याचा शोध करण्याचा निश्चय श्री अरविंदांनी केला होता. पण त्याच्या फलिताने त्यांचे समाधान मात्र झाले नाही. पाँडिचरीत आणखी थोडे प्रयत्न करून पाहिल्यावर त्यांनी हे प्रयोग सोडून दिले.

श्री अरविंदांच्या आगमनापूर्वदिखील पाँडिचरी नगरीने हिंदुस्तानातील काही क्रांतिकारकांना आणि राजकीय शरणार्थींना आसरा दिला होता. उदा. सुब्रह्मण्यम् भारती, श्रीनिवासाचारी, नयस्वामी अय्यर इत्यादी. भारताच्या स्वातंत्र्याला वाहिलेले, 'इंडिया' नावाचे एक साप्ताहिक त्यांतल्या काहींनी तामिळमध्ये चालविले होते.

हिंदुस्तानातील ब्रिटिश शासक अजूनही श्री अरविंदांविषयी भीतिग्रस्तच होते. त्यांच्यावर पाळत ठेवून शक्य तर त्यांना ब्रिटिश भारतात परत आणण्यासाठी गुप्तचर

विभागातले लोक नियुक्त झाले होते. असे दिसते की, नंद गोपाल चेट्टी या पाँडिचरीतील श्रीमंत सागरी अडत्याने ही नीच योजना पार पाडण्यात सहाय्य करण्याचे पत्करले होते. पण त्याला यश मात्र आले नाही. श्री. अरविंदांना पळवून नेण्याचा आपला डाव पार पाडण्यासाठी त्याने जो दिवस ठरविला होता त्याच दिवशी नेमके त्याला पकडावयाचे वॉरंट (औधर्षपत्र) निघाल्यामुळे, त्याला स्वतःला मद्रासेत पळून जावे लागले.

अशा रीतीने पराभूत झालेल्या ब्रिटिशांच्या गुप्तचरांनी श्री अरविंदांना अडकविण्याचा दुसरा एक डाव टाकला. राजद्रोही वाङ्मय-त्यातले काही बंगालीत होते-भरलेला एक डबा त्यांनी श्री अरविंदांच्या स्नेह्यापैकी एकाच्या, व्ही.व्ही.एस्. अय्यर यांच्या घरातील विहिरीत लपवून ठेवला. त्याच वेळी इकडे ब्रिटिशांच्या या हस्तकांनी, अय्यर आणि इतर लोक घातकी कार्यात गुंतलेले असून त्याचा पुरावा त्यांच्या घराची झडती घेतल्यास मिळू शकेल असे पोलिसात कळविण्यासाठी मयसेन नावाचा माणूस चाकरीवर नेमून दिला. सुदैवाने विहिरीतला तो डबा अय्यरांच्या एका नोकराला दिसला आणि श्री अरविंदांच्या सूचनेवरून त्याने स्वतःच पोलिसांत कळवून टाकले. फ्रेंच पोलीस आले आणि त्यांनी खोड्यात अडकवू शकणारे ते वाङ्मय ठेवलेला तो डबा शोधून काढला. श्री अरविंदांच्या घराची झडतीही घेण्यात आली. श्री अरविंदांना ग्रीकसकट अनेक युरोपीय भाषा येत असल्याचे पाहून शोध करणारे न्यायाधीश मांसीय नँदात स्वतःच बुचकळ्यात पडले. त्यामुळे त्यांच्या मनात आदरभाव निर्माण होऊन त्यांनी श्री अरविंदांना कार्यालयातील स्वतःच्या खोलीत बोलावून घेण्यासही कमी केले नाही!

माहिती पुरविण्यासाठी नेमलेल्या मयसेनला स्वतःची योजना बारगळल्याचे आढळून आले आणि खोटे निवेदन केल्याच्या आरोपाखाली खटला भरला जाण्याची भीती वाटू लागल्याने तोही ब्रिटिश हिंदुस्तानात पळून गेला.

गुप्तचरांची छुपी पाळत मात्र चालूच होती. श्री अरविंदांच्या आशीर्वादांनी आपला क्षयरोग बरा झाल्यास पाहावे या हेतूने नागन नाग नावाचा कोणी मनुष्य खुलन्याहून पाँडिचरीस आला. त्यामुळे श्री अरविंदांच्या घरात शिरकाव करण्याची संधी गुप्तचरांना मिळाली. त्यांनी आपल्या एका हस्तकाची (वीरेन्द्रनाथ रॉयची) नागनच्या घरातला स्वयंपाकी म्हणून नेमणूक करून घेतली; अशा प्रकारे त्याला श्री अरविंदांच्या परिवारात रिघाव मिळण्यास त्यांनी सहाय्य केले. पण काही दिवसांनी या स्वयंपाक्याला बंगाल्यात परत जावेसे वाटले, म्हणून त्याने कोणी तरी बदली नेमण्याविषयी पोलिसांना सांगितले. या नव्या स्वयंपाक्याने बीरेन्द्रला त्याच्या गोटा केलेल्या डोक्यावरून ओळखावे आणि त्या दोघांनी एका स्थानिक उपाहारगृहात भेटावे अशी योजना होती. (बदली) स्वयंपाक्याच्या येण्याचा दिवस आला तशी योजनेनुसार बीरेन्द्राने मुंडन करविले. काही विलक्षण योगायोगामुळे श्री अरविंदांजवळ राहाणाऱ्या मोनीनेही (सुरेश चक्रवर्तीनेही) मुंडन करावयाचे ठरविले. गडबडून गेलेल्या वीरेन्द्रने मोनीला परावृत्त करण्याचा प्रयत्न केला,

पण तो उलट हट्टालाच पेटला. आपण खरे कोण हे मोनीने ओळखले असावे असे वाटून, बीरेन् अधिकच घाबराघुबरा झाला आणि शेवटी आपण गुप्तचरांचा हस्तक असल्याचे त्याने सांगून टाकले. श्री. अरविंदांच्या पायाजवळ बसून तो रडू लागला. ब्रिटिश शासनाने दिलेला पैसाही श्री अरविंदांना अर्पण करायला तो सिद्ध झाला.

फ्रेंच हिंदुस्तानात राहाणाऱ्या शरणार्थींना आपल्या स्वाधीन करावे यासाठी फ्रेंच शासनावर आणलेले दडपण ब्रिटिश शासनाने अधिकच वाढविले (1912) सारे राजकीय शरणार्थी आपापल्या सुरक्षिततेसाठी फ्रेंच शासनावरच विसंबून होते. साहजिकच ते भयभीत झाले. विशेषतः उग्र स्वभावाच्या सुब्रह्मण्यम् भारतीनी श्री अरविंदांना विचारले, फ्रेंच शासनाने आपला पाठिंबा काढून घेतला, तर तुम्ही काय करणार? श्री अरविंदांनी शांतपणे उत्तर दिले, "भारती, मी पाँडिचरीहून रेसभरही हालणार नाही. मला काहीदेखील व्हायचे नाही हे मी जाणतो. तू आपल्या स्वतःपुरतं काय हवं ते करू शकतोस." एवढ्या आधारावर सुब्रह्मण्यम् भारतीनीही पाँडिचरीतच राहण्याचा निर्णय घेतला.

हा काळ त्यांना आर्थिक अडचणींचा होात. श्री अरविंदांनी चंद्रनगरच्या श्री मोतीलाल रायना लिहिले, "परिस्थिती अशी आहे की आमच्या हाती आठ आण्याच्या जवळपास रक्कम असेल...देव पुरवठा करील यात शंका नाही, पण त्याने तर शेवटच्या क्षणापर्यंत वाट पहाण्याची दुष्ट सवय लावून घेतली आहे."

पुढे आश्रमाचे कार्यवाह झालेले के. अमृत हे शाळेच्या सुट्ट्यांच्या दिवसांत पाँडिचरीत राहात असत. आणि तेही पैशांच्या अडचणीत होते. श्री अरविंदांनी स्वतःच्या अडचणींना न जुमानता त्यांना प्रथम सहाय्य केले. 'युद्ध आणि स्वयंनिर्णय' या आपल्या ग्रंथाचे सर्वाधिकारही श्री अरविंदांनी त्यांच्या भगिनी सरोजिनी यांस देऊन टाकले, कारण त्यांचीही परिस्थिती ओढगस्तीची होती.

श्री अरविंदांनी अलिपूर कारागृहात एकदा दहा दिवस उपवास केला होता. आता त्यांनी दुसऱ्या वेळी तेवीस दिवस उपवास केला. या काळात त्यांचे काम, व्यायाम, ध्यान आणि लेखन नेहमीसारखेच चालू असून, त्यांना स्वतःला थोडादेखील अशक्तपणा जाणवत नव्हता. त्यांचे वजन घटले, पण ते भरून काढण्याचा उपाय त्यांना आढळला नाही. हे अनशन हळूहळू न सोडता त्यांनी एकदम नित्याच्या प्रमाणात आहार घेण्यास प्रारंभ केला.

श्री अरविंदांच्या योगाभ्यासाची स्थिती या अवधीत काय होती? अध्यात्माला भौतिक पातळीवर उतरविणाऱ्या शक्तींचा पुष्कळसा विकास श्री अरविंदांनी आधीच साधला होता. 12 जुलै 1911 लाच त्यांनी एका पत्रात लिहिले होते, "अध्यात्माला भौतिक पातळीवर उतरविण्याच्या दृष्टीने आवश्यक त्या शक्ती मी वाढवतो आहे आणि आता स्वतःला इतर व्यक्तींमध्ये प्रविष्ट करवून, त्यांच्यात परिवर्तन घडवून आणण्यास मी समर्थ बनलो आहे. तम दूर सारणे, प्रकाश (ज्योती) आणणे, त्यांना नवे हृदय व नवे मन

देणे, या गोष्टी आता मी माझ्या जवळ असलेल्यांच्या संदर्भात तर अत्यंत त्वरेने व पूर्णत्वाने करू शकतोच, पण शेकडो मैल दूर असलेल्यांच्या संदर्भातही मला त्यांत यश लाभलेले आहे. माणसांचे स्वभाव व अंतरंग आणि त्यांचे विचारदेखील जाणण्याची शक्ती मला (ईश्वराने) दिली आहे, पण ती अजून सर्वस्वी परिपूर्ण नाही, तसेच अजून ती मला नेहमीच आणि सर्वच व्यक्तींवर योजता मात्र येत नाही. केवळ इच्छाशक्तीचा उपयोग करून कामात मार्गदर्शन करण्याचे माझे सामर्थ्यही वाढत असले, तरी ते अजून इतर शक्तींकडे बलवत्तर झालेले नाही. परलोकाशी जुळलेले माझे वळणही अजून चाचरत्या स्वरूपाचेच आहे, पण काही अत्यंत महान अशा शक्तींशी माझा संपर्क प्रस्थापित झाला आहे हे मात्र निश्चित. पण माझ्या मार्गातले शेवटचे अडथळे तेथून दूर सारले जातील, तेव्हाच मी या साऱ्या गोष्टींविषयी अधिक निश्चित लिहीन."

श्री अरविंदांचे साधन आणि कार्य अजून यांच्या कार्यात ज्या खऱ्याखुऱ्या सहकारी व्हावयाच्या होत्या त्या माताजींच्या आगमनाची प्रतीक्षा करीत होते. आणि त्या 29 मार्च 1914 ला फ्रान्सहून येऊन पोहोचल्या.

9

# माताजी

आता श्री अरविंद आश्रमाच्या 'माताजी' म्हणून जगभर विख्यात झालेल्या, त्यावेळच्या मीरा रिचर्ड या फ्रेंच युवती, 29 मार्च 1914ला दुपारी साडेतीन वाजता श्री अरविंदांना पहिल्यांदा भेटल्या.

पाँडिचरीस येण्यापूर्वी, 1910 मध्ये, तिने (अंशतः श्री अरविंदांच्या प्रतीकाशी एकरूप असलेल्या) स्टार ऑफ डेविडची (डेविडच्या ताऱ्याची) प्रतिकृती श्री अरविंदांना पाठवून दिली होती आणि श्री अरविंदांनी तिचा प्रतीकात्मक अर्थ विशद केला तेव्हा आपल्याला त्यांच्याच संगतीत कार्य करावयाचे आहे याची साक्ष तिला पटली.

29 मार्च 1994 ला, त्यांच्या अगदी पहिल्याच भेटीत तिने ओळखले की ज्यांना आपण श्रीकृष्ण म्हणत असू आणि जे आपल्या साधनेत आपल्याला मार्गदर्शन करीत ते ईश्वरीभूत गृहस्थ हेच.

श्री अरविंदांच्या पहिल्या भेटीसंबंधी माताजींनी म्हटले ते असे, "ज्या गोष्टी भावी काळात घडायच्या होत्या, पण कसं कोण जाणे आविर्भूत मात्र होत नव्हत्या, त्या गाढ ध्यानात मग्न असताना, उन्मनीत, मला दिसत होत्या. मला जे दिसलं होतं ते मी श्री अरविंदांना सांगितलं आणि ते आविर्भूत होणार आहे ना असं त्यांना विचारलं. ते नुसतं 'हो' म्हणाले आणि तत्काळ मला कळून आलं की उन्मनीनं पृथ्वीला स्पर्श केलेला आहे आणि त्याच्या साक्षात्काराला प्रारंभ होत आहे. जे सत्य होते ते वस्तुगत करण्याच्या शक्तीचा साक्षात्कार घडण्याची ही पहिलीच वेळ."

दुसऱ्या दिवशी, मार्च 30 ला तिने आपल्या डायरीत लिहिले, "गाढतम अज्ञानात बुडालेले प्राणी शेकड्यांनी असले तरी अडचण नाही. जो (ईश्वर)आम्हाला काल दिसला तो पृथ्वीवर अवतरला आहे. असा एक दिवस येईल की जेव्हा तमाचे रूपांतर प्रकाशात होईल आणि ईश्वरा, तुझे राज्य पृथ्वीवर प्रस्थापित होईल, हे सिद्ध करायला ईश्वराच्या उपस्थितीचं प्रमाण पुरेसं आहे."

पॅरिसमध्ये 21 फेब्रुवारी 1878 ला जन्मास आलेल्या माताजी श्री अरविंदांच्या पहिल्या भेटीच्या प्रसंगी छत्तीस वर्षांच्या होत्या. आपल्या एका वाढदिवसाच्या शुभावसरी

त्या म्हणाल्या होत्या, "मी जन्माने फ्रेंच, पण आत्म्याच्या व पूर्वीच्या लाग्याबांध्याच्या दृष्टीने मात्र भारतीय आहे."

अगदी बालपणापासून माताजी अतिमानवी होत्या. के.डी.सेठना यांनी लिहिलेल्या आणि 'मदर इंडिया' त प्रसिद्ध झालेल्या एका लेखात माताजींच्या पाँडिचरीतील आगमनापूर्वीच्या जीवनाची काही माहिती दिलेली आहे. त्यातले काही उतारे पुढे दिले आहेत.

"आपल्या पाठीशी असणाऱ्या आणि वारंवार आपल्या देहात प्रविष्ट होऊन तिथे असाधारण रीतीने व्यापार करणाऱ्या एका अतिमानवी शक्तीची जाणीव त्यांना (माताजींना) आपल्या समग्र बाल्यावस्थेत होती. ही शक्ती म्हणजे आपले स्वतःचेच गूढ जीवनतत्त्व आहे हेही त्या जाणून होत्या. तिच्या व्यापारांची काही उदाहरणे इथे देता येतील.

ती जवळ जवळ सात वर्षांची होती. तेरा वर्षांचा एक उद्दाम मुलगा मुलींना नेहमीच वेडावून दाखवी आणि म्हणे, "तुम्ही अगदी कुचकामाच्या असता." एक दिवस तिने त्याला हटकले, "बकबक बंद करशील का?" तो वेडावून दाखवतच राहिला. त्याच्यापेक्षा किती तरी लहानखोरी असूनदेखील, तिने त्याला एकदम पकडले, जमिनीवरून उंच उचलले आणि दाण्दिशी खाली आपटले. तिच्या ठायी अवतीर्ण होऊन तिला पराकाष्ठेची बलिष्ठ बनविणारी ती शक्ती महाकालीच असल्याचे तिला आयुष्यात उशिरा कळून आले.

आणखी एक उदाहरणः "फॉंटेनेब्लोच्याजवळ एका रानात ती खेळायला गेली होती. ती एका उभ्या चढणीच्या टेकडीवर चढत असताना तिचा पाय निसटला आणि ती खाली घसरू लागली. त्या रस्त्यावर अणकुचीदार काळे दगड विखुरलेले होते. खाली घसरत असताना आपल्याला कोणीतरी मांडीचा आधार देऊन हळूहळू खाली उतरवीत असल्यासारखे तिला वाटले. सपाटीवर पोचल्याबरोबर ती सुरक्षितपणे आपल्या दोन पायांवर उभी राहिल्याचे पाहून तिच्या साऱ्या सवंगड्यांना सहर्ष विस्मय वाटला."

"आपल्या वयाच्या सोळाव्या वर्षी तिने चित्रकला शिकण्यासाठी एका कलामंदिरात नाव घातले. ते पॅरिसमधल्या सर्वांत मोठ्या कलामंदिरांपैकी एक होते. तेथे ती वयाने सर्वांत लहान निघाली. इतर सर्व लोक आपापसात बोलत आणि भांडतही; पण तिने मात्र या गोष्टींत कधीच भाग घेतला नाही. ती नेहमी गंभीर आणि स्वतःच्या कामात मग्न झालेली असे. लोक तिला स्फिंक्स (नारसिंही मूर्ती) म्हणत. जेव्हाजेव्हा म्हणून त्यांच्यात कटकटी किंवा झगडे होत, तेव्हा आपल्या भानगडींचा निवाडा करून घेण्यासाठी ते तिच्याकडे येत. तिला त्यांचे विचार ओळखता येत अणि त्यांच्या शब्दापेक्षा किती तरी अधिक वेळा ती त्यांच्या विचारांचीच उत्तरे देई; त्यामुळे ते अतिशय बेचैन होत. ती आपले निर्णय, त्यात कलामंदिराच्या अधिकाऱ्यांचा संबंध येत असला तरीदेखील, तिळमात्र भीती न बाळगता देई. एकदा मंदिराची नियामिका म्हणून नियुक्त झालेली एक मुलगी, त्या

मंदिराच्या मुख्य अधिकारपदावर असलेल्या एका प्रौढ स्त्रीच्या मनातून उतरली. त्या स्त्रीची इच्छा त्या नियामिकेला काढून टाकावे अशी होती. म्हणून त्या लहान मुलीने स्वतःला सहाय्य करण्यासाठी या 'नारसिंही मूर्ती' ला शोधून काढले. "ती मुलगी किती निर्धन आहे आणि तिला कलामंदिर सोडावे लागले, तर चित्रकर्ती या नात्याने तिच्या जीवनक्रमाचा शेवटच होणार" हे माहीत असल्यामुळे हिला तिच्याविषयी सहानुभूती वाटली. आता कलामंदिराच्या मुख्याधिकाररिणीवर एका छोट्या पण निश्चयी समर्थकाला तोंड द्यायची पाळी आली. प्रथम तर्काधिष्ठित पक्षसमर्थनाचा तिने प्रयत्न करून पाहिला, पण तो कानामागेच टाकला गेल्याचे पाहून या समर्थिकेने निराळी रीत अवलंबली. थोड्या रागातच तिने त्या प्रौढेचा हात पकडला आणि अगदी हाडेच पिचून जाण्याइतका घट्ट पकडीत तो आवळून धरला. त्या नियामिकेला पुढेही तिथेच राहू द्यावे याविषयी लवकरच (दोघींचे) एकमत झाले! पुनश्च महाकाली कार्यरत झाली होती.

कलामंदिरातल्या या नारसिंहीचे व्यक्तित्व घरीदेखील असेच धीरगंभीर असे. ती क्वचितच स्मित किंवा हास्य करीत असे. आणि यापायी वीस वर्षांची असताना तिला आईकडून वाक्ताडनही करून घ्यावे लागले होते. "जगाची सारी दुःखे मलाच सोसायला हवीत." इतकेच उत्तर तिने आईला दिले होते दिले होते. तिच्या आईला तर ती भ्रमिष्ट झाली आहे असे वाटले. दुसऱ्या एका प्रसंगी आईने जे करायची आज्ञा केली होती ते न ऐकल्यामुळे तिला आईची बोलणी खावी लागली. तेव्हा तिने उत्तर दिले होते, "जगातली कोणतीही शक्ती मला आज्ञा पाळायला भाग पाडू शकत नाही."

माताजीचे शरीर निद्रितावस्थेत असताना कित्येक गुरूंनी त्यांना रहस्यविद्येत उपदेश केला होता. त्यांतले काही गुरू त्यांना पुढे भौतिक पातळीवरही भेटले होते. पुढे आंतरिक आणि बाह्य विकास जसजसा प्रगत होत गेला तसतसे या दैवी जीवांपैकी एकाशी त्यांचे मानसिक व आध्यात्मिक नाते अधिकाधिक सुस्पष्ट होऊन वारंवार जडू लागले. आणि त्या काळी त्यांना भारतीय दर्शने व धर्म यांसंबंधी अत्यंत थोडी माहिती असतानादेखील त्याला या (एकाला) कृष्ण म्हणण्याची प्रेरणा त्यांना झाली; त्याची आपल्याशी एक दिवस गाठ पडणार आहे हे त्यांना माहीत होते आणि ईश्वरी कार्य करावयाचे आहे तेही त्याच्याच संगतीने याचीही जाणीव त्यांना आता झाली. स्वतः चित्रकार असल्या कारणाने मनःपटलावरील प्रतिमांच्या अनुरोधाने त्या गुरूचे एक चित्रही त्यांनी रेखाटले होते.

थिओन नावाच्या एका पोलंडवासी तज्ज्ञाजवळ आणि त्याच्याहून अधिक गाढा अनुभव लाभलेल्या त्याच्या फ्रेंच पत्नीजवळ उच्चतर रहस्यविद्या शिकण्यासाठी त्यांनी काही वर्षे अल्जेरियातल्या टँजिअर्स गावी व्यतीत केली.

आपल्या प्रारंभीच्या वर्षांचे वर्णन माताजींनी पुढीलप्रमाणे केले आहेः "वयाच्या अकराव्या व तेराव्या वर्षांच्या अवधीत मानसिक व आध्यात्मिक अनुभवांच्या मालिकेने, नुसत्या ईश्वराच्या अस्तित्वाचीच नव्हे, तर माणसाची त्याच्याशी भेट घडण्याच्या किंवा

संवित्तीत व क्रियाशीलतेत त्याचा एकात्मक साक्षात्कार होण्याच्या किंवा दिव्य जीवनातून त्याचा पृथ्वीतलावर आविर्भाव होण्याचीही शक्यता मला स्पष्टपणे दाखविली." "प्रेअर ॲण्ड मेडिटेशन्स" (प्रार्थना व ध्यान) या नावाच्या आपल्या आध्यात्मिक दैनंदिनीत आपली साधना व पृथ्वीतलावरील आपली खरीखुरी भूमिका यांचे ओझरते दर्शन घडविणारे कित्येक अनुभव त्यांनी लिहून ठेवले आहे. त्यांतला एक असाः "मी लहान असताना जवळजवळ तेरा वर्षाच्या वयापासून एक वर्षभर अंथरुणावर पडल्याबरोबर मला असे भासे की मी आपल्या शरीराबाहेर पडून घराच्या वर थेट उंच चढले आहे आणि मग नगरावर खूपखूप उंच गेले आहे. त्या वेळी मी स्वतःपेक्षा लांबरुंद असे एक दैदीप्यमान, सोनेरी महावस्त्र परिधान केल्याचे मला दिसे आणि जसजशी मी वरवर चढत जाई तसतसे ते महावस्त्र विस्तार पावून मजभोवती वर्तुळाकार पसरत जाई आणि त्याचा जणू नगरावर एक अवाढव्य चांदवाच बने. मग मला सगळीकडून पुरुष, स्त्रिया, मुळे, म्हातारी माणसे, आजारी व्यक्ती, दुःखी पुरुष हे सर्व बाहेर पडताना दिसू लागत. आपापली दुःखे, आपल्या यातना, आपल्या आधीव्याधी निवेदन करीत आणि सहाय्याची याचना करी, ते त्या पसरलेल्या महावस्त्राखाली गोळा होत. ते लवचिक आणि सजीव महावस्त्र जणू काही त्यांच्या गाऱ्हाण्यांचे प्रत्युत्तर म्हणून त्यांतल्या प्रत्येकाकडे ओढ घेई आणि त्यांनी त्याला स्पर्श केला की लागलीच त्यांना सांत्वन किंवा आरोग्य लाभे आणि देहाबाहेर पडण्यापूर्वी कधीही नव्हते इतके सुखी आणि समर्थ बनून ते फिरून आपापल्या देहात प्रविष्ट होत."

पाँडिचरीत त्यांचे वास्तव्य एका वर्षाहून कमीच झाले, कारण पहिल्या जागतिक महायुद्धाला तोंड लागले होते. 22 फेब्रुवारीला त्या फ्रान्सला जाण्यासाठी निघाल्या. 1916 साली त्या फ्रान्सहून जपानमध्ये गेल्या आणि भारतात परत येईपर्यंत जवळजवळ चार वर्षे तिथेच राहिल्या.

1919 मध्ये रवीन्द्रनाथ टागोर, जपानमध्ये माताजींना भेटले. काही काळ ती दोघे एकाच पथिकाश्रमात राहात होती. एक दिवस रवीन्द्रानाथांनी त्यांना शांतिनिकेतनचा कारभार हातात घेण्याची विनंती केली, पण आपले भावी कार्य श्री अरविंदांच्या संगतीने व्हायचे आहे हे माहीत असल्यामुळे माताजींनी ती विनंती मान्य केली नाही.

22 फ्रेबुवारी 1915 ला फ्रान्सकडे निघाल्यावर, माताजी श्री अरविंदांना अधूनमधून आपल्या अनुभवांविषयी लिहीत आणि ते उत्तरेही पाठवीत असत. 26 जून 1916 च्या आपल्या पत्रात त्यांनी लिहिले होतेः

"आता शक्ती ज्याकडे वळत आहे ते प्रमुख उद्दिष्ट, उन्मनी जीवनाची ज्योती व शक्ती यांवर बळकट पकड बसविणे हेच होय. पण त्या प्रगतीत अडथळा निर्माण झाला होता. उन्मनीची ज्योती आणि आज्ञा यांसाठी मोकळे राहण्याचा प्रयत्न ज्या त्या वेळी बौद्धिक विचारांच्या आणि मानसिक इच्छांच्या जुन्या सवयी आपापल्या संसूचना त्या

मनात रिचवीत. त्यामुळे ती ज्ञानज्योती आणि ती ईश्वरेच्छा तुझ्या मनापर्यंत पोचत, त्या एका गोंधळलेल्या, विकृत आणि कित्येकदा तर बुद्धिभेद करणाऱ्या स्वरूपातच."

श्री अरविंदांनी 15 ऑगस्ट 1914 ला माताजींच्या सहकार्याने 'आर्य' नावाचे एक नियतकालिक चालू केले. या नियतकालिकाचा उद्देश दुहेरी होताः पहिला, जीवनातील उच्चतम समस्यांचा सुव्यवस्थित अभ्यास करणे आणि दुसरा पाश्चात्य आणि पौर्वात्य लोकांच्या धार्मिक परंपरांत सुसंवाद प्रस्थापित करणारा ज्ञानाचा प्रचंड समन्वय साध्य करणे. बुद्धिवादी असूनही इंद्रियातीत असणाऱ्या वास्तववादाची पद्धती त्यांनी स्वीकारलेली होती; या वास्तववादात वैचारिक व वैज्ञानिक नियमावलीत स्वयंस्फूर्त अनुभवांच्या परिपाठीशी साधलेले एकीकरण समाविष्ट होते. त्या प्रेरणेवर आधारलेल्या भिन्न भिन्न गटांचे आणि संस्थांचे मुखपत्र म्हणून उपयोगी पडावे हा या नियतकालिकाचा एक उद्देश होता.

'आर्य' बरोबरच त्याचे फ्रेंच भाषांतरही 'रिव्ह्यू द ग्रांद सिंथेसे' (भव्य समन्वयाचे नियतकालिक) या नावाने पाँडिचरीत प्रसिद्ध होत असे. पण जागतिक युद्धाच्या वाढत्या आवेगापायी हे प्रकाशन काही महिन्यांनंतर बंद पडले.

'लाइफ डिव्हाइन' (ईश्वरी जीवन), 'द सिंथेसिस ऑफ योग' (योगसमन्वय), 'ह्यूमन सायकल' (मानवी चक्र), 'द आयडियल ऑफ ह्यूमन युनिटी' (मानवैक्याचा आदर्श), 'द सीक्रेट ऑफ द वेद' (वेदाचे-रहस्य), 'द एसेज ऑन द गीता' (गीतेवरील निबंध), 'द फाउंडेशन्स ऑफ इंडियन कल्चर' (भारतीय संस्कृतीचे मूल सिध्दान्त) आणि 'फ्यूचर पोएट्री' (भविष्यकालीन काव्य) हे ग्रंथ -'आर्य' मध्ये क्रमशः प्रसिद्ध झाले. यांव्यतिरिक्त पुढील लहान लेखही प्रसिद्ध झालेः 'द व्हेअरफर ऑफ द वर्ल्ड' (जगाची उत्पत्तिकारणे), 'ईशोपनिषदादी' ग्रंथांच्या सटीक आवृत्या, 'द सोल ऑफ द प्लांट' (वनस्पतीचा आत्मा), 'द क्वेश्चन ऑफ द मंथ' (महिन्याचा प्रश्न), 'द न्यूज ऑफ द मंथ (मासिक वार्तापत्र, 'द साउथ इंडियन ब्राँझेस' (दक्षिण भारतातील काशाच्या मूर्ती), इत्यादी विविध विषयांवरील त्यांचे लेख हे त्यांच्या अध्ययनाचे आणि ध्यानाचे फलित होय. एक अफाट शक्ती त्यांच्या ठायी आवेगाने अवतीर्ण होई आणि 'आर्य' आपोआपच त्यांच्या लेखणीतून उतरत जाई.

'आर्य' चे प्रकाशन 1921 च्या प्रांरभी बंद पडले. ते प्रकाशन होते लाभदायक, पण आता श्री अरविंद आपल्या जीवनाच्या खऱ्याखुऱ्या ध्येयात म्हणजेच उन्मनीपर्यंत, उत्मन आणि उन्मनीचे अवतरण यांत अधिकाधिक प्रमाणात मग्न राहू लागले आणि त्यांना लेखनासाठी कमी कमी सवड मिळू लागली.

माताजी 24 एप्रिल 1920 पाँडिचरीस परत आल्या त्या ती पुन्हा कधीही न सोडण्याच्या बेतानेच. त्याच वर्षी 24 नोव्हेंबरला एक प्रचंड पावसाचे वादळ होऊन त्यांच्या राहत्या घराच्या छपराला हानी पोहाचली. हे वृत्त आणि ती हानी माताजीचे त्या

घरात राहणे असुरक्षित वाटण्याइतकी असल्याचेही श्री अरविंदांच्या कानी आली. म्हणून त्यंनी माताजींना 'रू फ्रान्सोई मार्ती'-क्रमांक 41 या आपल्या राहत्या घरी राहावयास येण्याचे निमंत्रण केले.

1921 मध्ये सामुदायिक ध्यानाची प्रथा चालू झाली. हे ध्यानानुष्ठान बहुधा दुपारी चारच्या बेताला होत असे आणि त्यानंतर निरनिराळ्या विषयावर भाषणे होत.

1 जानेवारी 1922 ला माताजींनी घराची सारी व्यवस्था स्वतःच्या हाती घेतली. 1922 च्या सप्टेंबरात ते 'रू फ्रान्सोई मार्ती'-क्रमांक 41 (पुढे अतिथिगृह हे अभिधान लाभलेल्या) मधून 'रू द ला मरीन' क्रमांक 9 मध्ये रहावयास गेले. सध्याचे आश्रमाचे मुख्य निवासस्थान असून श्री अरविंदांची समाधीही तेथेच आहे.

10

# ऊर्ध्वमनाचे अवतरण

श्री अरविंदांची साधना अव्याहतपणे चालू होती. भारताच्या राष्ट्रीय काँग्रेसचे अध्यक्षपद स्वीकारण्याच्या अनेक विनंत्या त्यांनी एकाहून अधिक वेळा अव्हेरिल्या. त्यांनी 1920 मध्ये डॉ. मुंजे यांना लिहिलेले पत्र विशेष उद्‌बोधक ठरतेः "आपल्याला अगोदरच तारेने कळविल्याप्रमाणे राष्ट्रसभेचे अध्यक्षस्थान स्वीकारण्याची आपली सूचना मी मान्य करू शकत नाही...क्रांतिकारक स्वरूपाच्या आध्यात्मिक, सामाजिक व आर्थिक पुनर्रचनेचे कार्य करण्यास मी निश्चितपणे प्रारंभ केलेला आहे. त्या दृष्टीने मी सतत व्यावहारिक अथवा प्रयोगशाळेतील प्रयोग, कमीत कमी त्यांवर देखरेख तरी, करीत असतो. आणि त्यांसाठी मला लाभलेली संपूर्ण ग्रहणक्षमता आणि शक्ती यांची आवश्यकता आहे. स्वतःच्या उर्वरित आयुष्यातले माझे धर्मव्रत म्हणून मी ते कार्य अंगीकारलेले आहे."

जे त्यांना साधनेसाठी सज्ज झालेले आढळत त्यांना ते सदैव उत्तेजन देत. राष्ट्रवादी चळवळीत पडलेले श्री अरविंदाच्या शिष्यांतले एक, अंबूभाई पुराणी हे एक शिष्य, त्यांना 1918 च्या डिसेंबरमध्ये भेटले. श्री अरविंदांनी त्यांना त्यांच्या साधनेविषयी विचारले. पुराणींनी आपल्या प्रयत्नांचे वर्णन केले आणि ते पुढे म्हणाले, "भारत स्वतंत्र होत नाही तोवर त्यावर मन एकाग्र करणे कठीणच आहे." मग श्री अरविंदांनी विचारले, "समजा भारत स्वतंत्र होईलच अशी निश्चिती आपणास कोणी दिली तर?" पुराणी निरुत्तर झाले. त्यांनी पृच्छा केली, "अशी निश्चिती कोण देऊ शकणार?" श्री अरविंद उत्तरले, "समजा मीच तुम्हाला तशी निश्चिती दिली तर?" या उत्तराने पुराणींचे समाधान झाले आणि ते म्हणाले, "आपण ही निश्चिती देत असाल, तर मी ती मानू शकेन." त्यांच्याकडे वळून श्री अरविंद उत्तरले, "मग भारत स्वतंत्र होईलच ही निश्चिती मी आपणास देत आहे."

आपल्या व्यक्तिगत प्रश्नाचे निराकरण झाल्यानंतर पुराणी संतोषाने गुजरातेत परतले. पाँडिचरीस पुन्हा परतल्यावर त्यांना श्री अरविंदांचा देह पिवळसर पांढऱ्या रंगाने झगमगताना आढळला. श्री अरविंदांनी स्पष्टीकरण केले, "उच्चतर संवित्ती मानसिक स्तरावरून प्राणमय स्तरावर अवतीर्ण होते आणि प्राणमय स्तराच्यादेखील खाली येते, तेव्हा पार्थिव आणि ज्ञानतंतुमय देहात मोठेच परितर्वन घडून येते." काही दिवसांनंतर पुराणींनी त्यांना विचारले, "आपण कशासाठी थांबला आहात?" श्री अरविंदांनी आपल्या

नित्याच्या मृदू वाणीने उत्तर दिले, “ईश्वरी संवित्ती अवतीर्ण झालेली आहे हे खरे, पण ती अजून पार्थिव देहात उतरलेली नाही. ही गोष्ट साध्य झालेली नाही तोवर काम पार पडले असे म्हणता येत नाही.” 1921 साली हिवाळ्याच्या मध्यावर दगडफेकीची विख्यात घटना घडली. वट्टल नावाच्या एका स्वयंपाक्याला कामावरून काढून टाकले होते. क्रोधांध होऊन तो जारणमारणात प्रवीण असलेल्या एका मुसलमानाकडे गेला. एका ठिकाणच्या दगडांना अदृश्य करून तेच दुसऱ्या स्थानी दृश्यमान करीत त्या फकिराने आश्रमातल्या एका घरावर दगडफेक चालू केली. पोलिसांना बोलावण्यात आले. पण एक दगड आकस्मिकपणे एका पोलिसाच पायामधून सणसणत निघून गेला; तेव्हा गडबडून जाऊन पोलिसांनी ते प्रकरण तसेच सोडून दिले. त्या घरातल्या एका चाकरावर विशेष रोख होता. स्वतःला असलेल्या या गोष्टींच्या माहितीच्या आधारे माताजींनी असा निर्णय केला की घर आणि तो नोकर यांच्या परस्पर संबंधावरच ही प्रक्रिया निश्चितपणे अवलंबून असणार. म्हणून त्या नोकराला त्यांनी काढून दिले आणि तो सारा चमत्कार लगेच थांबला.

पुढे वट्टल या स्वयंपाक्याला असाध्य रोगाने पछाडले. त्याच्या बायकोने श्री अरविंदांची विनवणी केली आणि त्यांनीही उदारपणाने त्याला क्षमा केली. ते म्हणाले, “यापायी तो मरायला नको.” आणि वट्टल बरा झाला.

1923 मध्ये श्री अरविंदांचा वाढदिवस साजरा करण्याचा निश्चय त्यांच्या शिष्यांनी केला. श्री अरविंद उद्गारले, “ईश्वरी सत्य आचरणात उतरवित्यानेच आपल्याला तो साजरा करता येईल.”

पुढच्या वर्षी, 1924 मध्ये स्वतःच्या जन्मदिवशी बोलताना ते म्हणाले, “स्वतःचे विचार मूक संवित्तीच्या माध्यमातूनच प्रकट करणे मला अधिक आवडते, कारण भाषेचे आवाहन मनालाच पोचते, तर मूक संवित्तीच्या माध्यमातून माणसाला काही अधिक गहन तत्त्वाचा संपर्क साधता येतो.”

आणखी दोन वर्षे उलटल्यावर, 24 नोव्हेंबर 1926 ला अत्यंत महत्त्वाची अशी एक घटना घडली-ऊर्ध्वमनाचे पार्थिवात अवतरण झाले. श्री अरविंदांच्या लेखनाशी परिचित असलेल्या लोकांत ती ‘सिद्धीची तीथ’ म्हणून प्रसिद्ध आहे. आश्रमातील चार दर्शनतिथीतली ही एक होय.

1926 च्या प्रारंभापासून साधकांना एका उच्चतर शक्तीच्या सान्निध्याचा प्रभाव वाढत्या प्रमाणात जाणवू लागला. आणि आता ते मार्गदर्शनार्थ माताजींकडे वळू लागले.

24 नोव्हेंबर 1926 ला संध्याकाळी वातावरणात एक प्रकारची उत्कंठा दाटली होती आणि निरोपाप्रमाणे सर्व शिष्य नित्याच्या ध्यान करण्याच्या पडवीत जमा झाले होते. आश्चर्य असे की या साधकांची संख्याही चोवीसच होती. चिनी धर्तीचे पंख असलेले तीन सर्प सोनेरी धाग्यानी भरलेला एक पडदा माताजी आणि श्री अरविंद यांच्या पाठीमागच्या भिंतीवर टांगलेला होता. माताजींनी आणि श्री अरविंदांनी साधकांना आशीर्वाद दिले

आणि मागून अल्पकाळ ध्यान करण्यात आले. एक प्रकारचे प्रकाशमय वातावरण आश्रमात नेहमीच असे. पण त्या दिवशी तर ते विशेष आधिक्याने जाणवत होते. या घटनेचे वर्णन श्री अरविंदांनी पुढीलप्रामणे केले आहेः

"24 नोव्हेंबर 1926 ला पार्थिवात कृष्णाचे अवतरण घडून आले. कृष्ण म्हणजे उन्मनीची दीप्ती नव्हे. कृष्णाचे अवतरण याचा अर्थ उर्ध्वमनी देवतेचे अवतरण...तीच उन्मनी अवस्थेच्या आणि आनंदाच्या अवतरणाची पूर्वसिद्धता होय."

पार्थिव संवित्तीत उन्मनी अवस्थेचे अवतरण पुढे तीस वर्षानी, 1956 मध्ये घडून आले.

1926 च्या नोव्हेंबर नंतर लवकरच श्री अरविंदांनी आपले शिष्य व दर्शनेच्छू यांच्याशी सर्व प्रकारचा वैयक्तिक संपर्क वर्ज्य केला आणि ते विविक्तवासी बनले मग आश्रमाचा संपूर्ण कार्यभार माताजींनी स्वीकारला. श्री अरविंदांच्या विविक्तवासामुळे कित्येक साधक गडबडून गेले. श्री अरविंदांनी त्यांना पुढील आश्वासन दिलेः "माताजींचे तुम्हाला काहीच सहाय्य होणार नाही असे तुम्हाला वाटते आहे...त्यांच्या सहाय्यापासून तुम्हाला लाभ होणार नसेल, तर माझ्या सहाय्यात तुम्हाला त्याहूनही कमी लाभ आढळेल. पण काही झालं तरी एकही अपवाद न वगळता, एकूण एक शिष्यांसाठी मी स्वतःच करून ठेविलेल्या व्यवस्थेत फेरफार करण्याची माझी इच्छा नाहीः एकूणएक शिष्यांना त्यांच्याकडूनच ज्ञानदीप व शक्ती लाभेल, साक्षात् मजकडून नव्हे; आपापल्या आध्यामिक प्रगतीसाठीही त्यांचेच मार्गदर्शन मिळेल. ही व्यवस्था मी करून ठेवली ती काही एखाद्या तात्पुरत्या उद्देशाने नव्हे, तर माताजींचे व्यक्तिमत्त्व व सामर्थ्य ध्यानी घेता तोच एकुलता एक खराखुरा प्रभावी मार्ग ठरतो आणि म्हणून. साधकाने मोकळ्या मनाने ग्रहण मात्र करायला हवे."

श्री अरविंदांचा योग हा काही नवा नसून, उन्मनीसारखे (सुप्रामेंटल, सुप्रामाइंड) त्यांनी योजिलेले पारिभाषिक शद्बच तेवढे नवे आहेत, पण हा योग तर प्राचीनांनी अगदी पुरातन काळापासून साध्य केलेला होता, असा एक सर्वसाधारण समज या काळात रूढ झाला होता तो काढून टाकण्यासाठी श्री अरविंदांनी लिहिले, "प्राचीन काळी हा योग साधण्याचे प्रयत्न असंख्य वेळा झालेले असून अनेक वेळा परंज्योतीही अवतीर्ण होऊन फिरून अपसंहत झालेली आहे, अशी एक कल्पना रूढ आहे. हे खरे दिसत नाही. उन्मनीतील पार्थिव देह खाली आणला गेलेलाच नाही असं मला आढळून आलेलं आहे; नाही तर तो तेथे विद्यमान असता. म्हणूनच आपण स्वतःचे प्रयत्न हीन लेखून त्यांच्या सिद्धीच्या मार्गात अडथळे आणू नयेत."

उन्मनीचे साधन चालूच होते. तिच्या अवतरणासाठी आधारभूमी सिद्ध केली जात होती.

1935 मध्ये श्री अरविंदांनी लिहिले आहे, "ईश्वराचा काही ना काही साक्षात्कार घडलेले पाच-सहाहून, अधिक लोक आश्रमात आधी पासूनच आहेत. काहींना वेदान्ती तर

कांहींना भक्तिपंथाचेही साक्षात्कार घडले आहेत. पण या साऱ्याला काही महत्त्व नाही कारण जो आश्रमाबाहेर परिपूर्ण साक्षात्कार ठरतो तोच आश्रमात सिद्धीचा नुसता प्रारंभ ठरतो. मानसिक, आध्यात्मिक आणि सरतेशेवटी उन्मनी या क्रमाने होणारे प्रकृतीचे परिवर्तन हाच इथला निकष आहे."

24 नोव्हेंबर 1938 रात्री दोनच्या संधीला श्री अरविंदाचा पाय त्यांच्या खोलीतच घसरून त्यांच्या गुडघ्याच्या हाडाला गंभीर दुखापत झाली. त्यामुळे दर्शन रहित करावे लागले.

श्री अरविंदांनी निवेदन केले, "कित्येक वेळा प्रतिकूल शक्तींनी दर्शनासारख्या गोष्टींत अडथळे आणले, पण त्यांचे सारे आघात परतविण्यात मला यश आलेले आहे. माझ्या पायाला अपघात झाला त्या वेळी माताजींच्या रक्षणात व्यग्र असल्याकारणाने, मी स्वतःला विसरलोच होतो. आपल्यावर प्रतिकूल शक्ती आघात करतील असे मला वाटले नव्हते. ती माझी चूकच होती." आणि फिरून निराळ्या संदर्भात (त्यांनी म्हटले आहे): "अर्थातच युद्धातील एक वस्तुस्थिती या नात्याने मी त्याचा स्वीकार करतोच आहे."

या अपघातामुळे काही डॉक्टरांना आणि साधकांना त्यांची वैयक्तिकरीत्या शुश्रूषा करण्याची संधी लाभली.

1926 च्या नोव्हेंबरमध्ये शारीरिक दृष्ट्या विजनवास पत्करल्यानंतर, श्री अरविंद 21 फेब्रुवारी, 15 ऑगस्ट आणि 24 नोव्हेंबर-अशा तीन दिवशी, दर्शन देत असत. 1939 नंतर 24 एप्रिल हीसुद्धा दर्शनाची चौथी तीथ म्हणून जोडण्यात आली. माताजींचा जन्मदिन, त्यांचा स्वतःचा जन्मदिन, सिद्धीचा दिवस आणि माताजी नित्य वास्तव्यर्थ पाँडिचरीत आल्या तो दिवस, असे हे चार दिवस होते.

एकदा दर्शनासाठी आलेल्या एका अंध साधूला विचारले, "दिसतच नसताना दर्शनासाठी आल्याचा काय उपयोग?" तो साधू उत्तरला, "श्री अरविंद आपल्या दिव्य नेत्रांनी मजवर दृष्टिक्षेप करतात हे त्याहून किती तरी अधिक महत्त्वाचे आहे" त्यांच्यासमोर उभे रहाण्यास मिळाल्याने आणि त्यांच्या दृष्टिक्षेपाचा स्वतःच्या जीवनाच्या अथांगास स्पर्श झाल्याने किती तरी लोकांना कृतार्थ झालेसे वाटे. ते पुन्हा पुनः येत यात आश्चर्य नाही. आपल्याला श्री अरविंदांचे दर्शन प्रतिमास घेता येईल तर ते किती अपूर्वाईचे ठरेल. त्यांच्या आळवण्या गुरुंच्या कानावर घातल्या गेल्या. पण त्यांनी त्या मान्य मात्र केल्या नाहीत. त्यांनी उत्तर केले, "मी प्रति मास एकदा बाहेर गेलो तर, माझ्या त्या निर्गमनाचा प्रभाव एकतृतीयांशाने कमी होईल."

11

# कार्यरत आध्यात्मिक शक्ती

जगात चाललेल्या साऱ्या घडामोडींकडे श्री अरविंदाचे बारीक लक्ष असे. 1939 च्या सप्टेंबरमध्ये जागतिक युद्धाला तोंड लागले, तेव्हा प्रारंभी त्यांनी त्यात व्यक्तिशः सक्रिय लक्ष घातले नाही. पण फ्रेंचांनी नाझींपुढे शरणागती स्वीकारली आणि ब्रिटिश सेना डंकर्कमार्गे निघून गेली तेव्हा मात्र श्री अरविंदांनी स्वतःची आध्यात्मिक शक्ती मित्रराष्ट्रांच्या पाठीशी उभी केली. नंतर जर्मन विजयाच्या झपाट्याला जवळजवळ तात्काळ आळा बसलेला आणि युद्धाचा ओघ विरुद्ध दिशेला वळलेला पहाण्याचे समाधान त्यांना लाभले.

आध्यात्मिक संवित्तीत प्रगत झालेल्या लोकांच्या ठायी झंझावाती आध्यात्मिक शक्ती असू शकते. ती शक्ती लाभताक्षणीच प्रथम श्री अरविंदांनी केवळ स्वतःच्या व्यक्तिगत कार्याच्या सीमित क्षेत्रापुरती आणि नंतर मात्र सतत जागतिक कार्यासाठी योजिली.

13 मार्च 1944 ला त्यांनी एका शिष्याला लिहिले, "माझी शक्ती आश्रम आणि तेथील परिस्थती यांच्यापुरती सीमित खचितच नाही. युद्धाच्या आणि मानवी जगाच्या परिवर्तनाच्या यथायोग्य परिणतीला सहाय्य करण्यासाठीही ती मोठ्या प्रमाणावर योजिली जात असते हे तुम्ही जाणता."

आपल्या या हस्तक्षेपाच्या कारणांचे विवरण त्यांनी आपल्या शिष्यांतील एकाला पाठवलेल्या आणखी एका पत्रात केले आहेः "काही राष्ट्रांचे इतरांविरुद्ध युद्ध किंवा हिंदुस्तानासाठी लढाई या दृष्टीने तुम्ही त्याकडे पाहू नये; मानवजात आणि पृथ्वी यांना निकटवर्ती भविष्यकाळातच ग्रासून टाकू पहाणाऱ्या अज्ञानाविरुद्ध आणि असत्याविरुद्ध आणि जे असून पूर्णत्वाने साकार व्हावयाचे आहे त्या दैवी सत्यासाठी आणि जे मानवतेच्या जीवितात जातीने सुप्रतिष्ठित व्हायचे आहे त्या ध्येयासाठी चाललेला हा लढा आहेच. शोध लावायचा आहे तो या किंवा त्या बाह्य परिस्थितीचा नव्हे, तर त्या संघार्षामागे उभ्या असलेल्या शक्तींचा...एक विशिष्ट (विरुद्ध) पक्ष जिंकला तर असत्या समग्र स्वातंत्र्याचा आणि ज्ञानदीप्ती व सत्य यांच्या आशेचा लोप होऊन जे कार्य पार पाडावयाचे आहे त्यावर अशा काही मर्यादांचे बंधन पडेल की त्यामुळे ते मानवी शक्तीच्या दृष्टीने असाध्य होऊन बसेल; अंधकार आणि असत्य यांची राजवट प्रस्थापित

होईल, बहुतेकांचा इतका निर्घृण छळ आणि इतकी विटंबना होईल की जी या देशातील लोकांच्या कधी स्वप्नातही आली नसेल किंवा जिची त्यांना अद्याप मुळी कल्पनाच करता येणार नाहीच. आपण मानवतेच्या स्वतंत्र भवितव्याचे समर्थक असल्याचे घोषित करणारा दुसरा पक्ष विजयी झाला तर हे भयानक संकट टाळता येईल आणि ज्या आध्यात्मिक सत्याची पृथ्वीवर प्रतिष्ठापना करण्यासाठी आपण निर्धाराने उभे ठाकलो आहोत, जे ईश्वरी कार्य करावयाचे आहे, त्यासाठी वृद्धिंगत होण्याची संधी दैवी आदर्शाला लाभण्याजोगी परिस्थिती निर्माण होईल. या कार्यासाठी लढणारे ईश्वराच्या बाजूने आणि असुरांच्या संभाव्य राजवटीच्या विरुद्ध लढा देत आहेत."

श्री अरविंदांनी युद्धनिधीसाठी वर्गणी दिली. 1942 मध्ये, हिंदुस्थानला लढाईनंतर साम्राज्यांतर्गत स्वतंत्र राज्याचे स्थान देण्याचा स्वतःचा प्रस्ताव घेऊन, सर स्टॅफर्ड क्रिप्स आले, तेव्हा त्यांनी (त्याच्या) स्वीकृतीची सूचना केली होती. पण भारतीय नेते मात्र (काहीच) ऐकायच्या मनःस्थितीत मुळीच नव्हतेच. श्री अरविंद फिरून, आपल्या आक्रमकांविरुद्ध नुसत्या आध्यात्मिक बळाचाच वापर करण्याच्या विश्वसनीय भूमीकडे वळले. भारतावर नुसती स्वारी करण्याचाच नव्हे, तर आक्रमण करून भारत जिंकण्याचा जपानचा उद्देश असल्याचे उघडकीस येईपर्यंत, त्यांनी विविध कारणांपायी जपानविरुद्ध स्वतःच्या आध्यात्मिक सामर्थ्यानिशी हस्तक्षेप केलेला नव्हता. मग मात्र त्यांनी फिरून स्वतःच्या आध्यात्मिक शक्तीचा उपयोग केला आणि आडवी येणारी प्रत्येक गोष्ट झपाट्याने दूर सारीत पुढे जाणाऱ्या जपानी विजयाच्या घोडदौडीला पायबंद बसलेला पहाण्याचे त्यांना लाभले. तत्क्षणीच त्या घोडदौडीचे रूपांतर वेगवान, विध्वंसक आणि शेवटी अपरिमित व सर्वंकष अशा पराजयात व पिछेहाटीत झाले.

कालांतराने, अंतर्गत अडचणीवर मात करून भारतभूमी स्वतंत्र झाली. आणि अशा प्रकारे भारताच्या भवितव्याचे स्वतःला झालेले पूर्व साक्षात्कारही सार्थ झालेले पहाण्याचे समाधान त्यांना लाभले.

त्यांनी लिहिले आहे, "अंतरंगातून मार्गदर्शन करणे बाह्य सूचनांद्वारा मार्गदर्शन करण्याहून लाखपट सोपे असते. कल्पना करू या की 'क्ष' या सेनानीने 'य' च्या माणसाला 'ग' या स्थानापर्यंत मागे पिटाळून लावावं अशी माझी इच्छा आहे. मी त्याच्यावर योग्य त्या शक्तीची योजना करतो, तो जागा होतो आणि स्वतःचं सैनिकी ज्ञान आणि बळ यांच्या सहाय्याने तो बिनचूक कृती करतो आणि (हवं होतं) ते नेमकं पार पडतं. परंतु स्वतःच्या ठायी सुप्त किंवा प्रकट सैनिकी प्रतिभा नसूनही मी त्याला लिहीन आणि म्हणेन, 'हे करा, ते करा तर तो ते करण्यास सिद्ध होणार नाही, आणि मला हवे ते पारही पाडता येणार नाही. संवित्तीच्या दोन अगदी भिन्न अशा क्षेत्रांतले हे व्यापार असतात."

इतर प्रसंगीही ते स्वतःची शक्ती मुकाट्याने योजीत असत. त्यांच्याच शब्दांत सांगायचे तर, "स्पेनमध्ये मला गौरवपूर्ण यश लाभले. सेनापती मायका हे प्रभाव

पाडण्याजोगे एक उत्कृष्ट माध्यम होते. शक्तींचे सफलकार्य माध्यमावरच अवलंबून असते. बास्कच्या संदर्भात पुरते अपयश आले. नागूस हाही माध्यम म्हणून उत्कृष्ट होता. पण त्याच्या भोवतालचे लोक मात्र उत्तम योद्धे असूनही पराकाष्ठेचे असंघटित आणि अगदी भलत्याच कामात गुंतून पडणारे होते. इजिप्तला जय लाभला नाही. आयर्लंडला व तुर्कस्तानला प्रचंड विजय मिळाला. मला बंगालमध्ये जे करायचं होतं, अगदी तेच मी आयर्लंडमध्ये केलं होतं..."

"जगाच्या नकळत ती जगाच्या बाजूला खडी ठाकली," हा 'सावित्री' काव्यातला चरण त्यांच्या कार्याला चपखलपणे लागू पडतो.

आणखी एका प्रसंगी श्री अरविंद म्हणाले, "रशियातील क्रांतीच्या यशासाठी मी तीन वर्षे झटत होतो असं मी म्हणू लागलो तर ते हास्यास्पद आणि उन्मत्तपणाचंही दिसेल. क्रांती सफळ करण्यासाठी झटणाऱ्या शक्तींतली एक शक्ती मी स्वतः होतो."

15 ऑगस्ट 1947 ला भारत स्वतंत्र झाला. त्या प्रसंगी त्यांनी दिलेल्या, स्वतःची भविष्यकालविषयक स्वप्ने निवेदित करणाऱ्या संदेशातले काही उतारे खाली देत आहोतः

"15 ऑगस्ट हा माझा जन्मदिन आहे आणि त्याला इतकं व्यापक महत्त्व लाभावं याचा मला आनंद होणं स्वाभाविकच आहे. पण माझ्या दृष्टीने हा योगायोग आकस्मिकपणे आपोआप मात्र जुळून आलेला नाही, तर ज्या कार्याने मी स्वतःच्या जीवनास प्रारंभ केला त्याकडे माझी पावले वळविणाऱ्या दैवी शक्तीची (तो योगही) अनुज्ञा व (स्वीकृतीची) मुद्रा असून, त्याच्या साफल्याचाही तो शुभारंभ आहे. खरोखर ज्या ज्या म्हणून जागतिक चळवळी अशी स्वतःच्या आयुष्यातच सफल झालेल्या पहावयास मिळतील अशी आशा मी बाळगली होती त्या साऱ्यांचे आज मला निरीक्षण करता येत आहे. त्या तेव्हा जरी अव्यवहार्य स्वप्नांसारख्या वाटत असल्या, तरी आज त्या सफल होत आलेल्या किंवा साफ त्याच्या मार्गाला लागलेल्या दिसत आहेत. स्वतंत्र व एकसंध भारताची निर्मिती करणारी क्रांतिकारक चळवळ हे या स्वप्नांमधलं पहिलं स्वप्न होतं. भारत आज स्वतंत्र झाला आहे, परंतु त्याला एकसंधता मात्र लाभलेली नाही...पण कोणत्याही उपायांनी, कोणत्याही मार्गाने, (भारताचे) हे विभाजन नष्ट झालेच पाहिजे. एकसंधता साध्य करून घ्यायलाच हवी आणि तशी ती घेतली जाईलच, कारण भारताच्या भवितव्यतेच्या महतीसाठी तिची निकड आहे."

"आशियातल्या लोकांचे पुनरुत्थान व दास्यविमोचन आणि मानवी संस्कृतीच्या विकासकार्यातील स्वतःच्या महान भूमिकेवर त्याचे फिरून अधिष्ठान हे दुसरं स्वप्न होतं. आशिया जागृत झाला आहे; (त्याचे) मोठाले प्रदेश आता पूर्णपणे स्वतंत्र झाले आहेत किंवा या क्षणाला मुक्त केले जात आहेत. त्याचे इतर परतंत्र वा अंशतः परंतंत्र असलेले प्रदेशही वाटेल त्या संघर्षांमधून स्वातंत्र्याची वाटचाल करीत आहेत.'

'समग्र मानवजातीच्या अधिक चांगल्या, अधिक उज्ज्वल आणि अधिक गौरवशाली

जीवनाच्या बाह्य आधार होईल असा एक जगत्सघ हे माझं तिसरं स्वप्न होतं.'

'ऐक्याची एक नवी वृत्ती मानवजातीवर वर्चस्व प्रस्थापित करील.'

'भारताने जगाला आध्यात्मिक देणगी द्यावी हे माझे आणखी एक स्वप्न कधीचं सफल होऊ लागलं आहे. भारताची आध्यात्मिकता सतत चढत्यावाढत्या प्रमाणात युरोप व अमेरिका या खंडांत प्रविष्ट होऊ लागली आहे.'

एका अधिक उच्च आणि अधिक विशाल अशा जाणिवेपर्यंत मानवाचे उन्नयन करणारी आणि त्याने विचार करण्यास प्रारंभ केला तेव्हापासून, तसेच वैयक्तिक पूर्णोत्कर्ष आणि सर्वगुणसंपन्न समाज यांची स्वप्ने त्याला पडू लागली तेव्हापासून त्याला संभ्रमात टाकून त्रस्त करणाऱ्या समस्यांची उकल आरंभिणारी, उत्क्रांति-मार्गावर टाकलेली पावले हे माझे शेवटचे स्वप्न होते."

# 12

# सूक्ष्म पार्थिवांशातः उन्मनीचे अवतरण

श्री अरविंदांनी 5 डिसेंबर 1950 ला रात्री एक वाजून सव्वीस मिनिटांनी आपल्या पार्थिव देहाचा त्याग केला. उन्मनी दीप्तीचे घनदाट वलय भोवती केंद्रित झालेले असल्यामुळे तो देह एकशेअकरा तास उज्ज्वल राहिला होता. ते पार्थिव देह सोडून गेले ते विशिष्ट गोष्टी साध्य करावयाच्या, म्हणजेच उन्मनीला पार्थिवांशात उतरावयाचे होते, म्हणूनच हे उघड आहे.

माताजींनी निवेदन केले, "श्री अरविंदांचे और्ध्वदेहिक आज केलेले नाही. त्यांच्या देहावर उन्मनी दीप्तीचे एवढे मोठे वलय केंद्रीभूत झालेले आहे की ना कुजण्याचे कसलेही चिन्ह दिसत नाही आणि म्हणून त्यांचा देह अविकल असेतो त्यांच्या अंथरुणावर आहे तसाच ठेवला जाईल."

माताजींनी याच वेळी केलेल्या इतर घोषणांत पुढील गोष्टींचा समावेश होताः-

"परमेश्वरा तुझे कार्य सिद्धीस जाईपर्यंत, केवळ मार्गदर्शन व प्रकाश देणाऱ्या संवित्तीच्या रूपातच नव्हे, तर कार्यमग्न झालेल्या गतिमान सत्तत्वाच्या रूपातही, तू आमच्यात वास्तव्य करशील असे आश्वासन तू मला आज सकाळी दिलेस. तू सर्वांशांनी आमच्यात रहाशील आणि पृथ्वीचे परिवर्तन घडून येईतो पृथ्वीचे वातावरण सोडून जाणार नाहीस. असे वचन अगदी निःसंदेह शब्दांत तू मला दिले आहेस. आम्ही या सतत्त्वाच्या उपस्थितीला पात्र ठरावे आणि यापुढे तुझे उदात्त कार्य करण्यासाठी अधिकाधिक पूर्णत्वाने व्रतबद्ध होण्याच्या एकमेव इच्छेवर आमच्यातला कणन् कण केंद्रित होऊन रहावा असे वरदान दे."

"मी पुनरुज्जीवित होण्यास सांगितले तेव्हा त्याने स्पष्टच सांगितले, मी देहाचा त्याग हेतुपुरःसर केलेला आहे. ते मी फिरून ग्रहण करणार नाहीच. उन्मनीमार्गाने साकार केलेल्या पहिल्याच उन्मनी देहाच्या रूपात मी फिरून प्रकट होईन."

"जगत-परिर्वतनाच्या आपल्या कार्याला अधिक परिपूर्णत्वाने सहाय्यभूत व्हावे यासाठी ज्यांनी आपल्या पार्थिव देहांचा त्याग केला त्यांच्या प्रत्यक्ष समोरच आम्ही उभे आहोत."

9 डिसेंबरला ईश्वरीय दीप्ती लोप पावू लागली, तेव्हा पाटलवर्णी शिसवी

लाकडाच्या एका शवपेटिकेत घालून तो देह आश्रमाच्या अंगणातील 'प्रार्थनावृक्षा' खाली ठेवला. त्यांची ही समाधी हे साधकांच्या दृष्टीने ध्यान व साक्षात्कार यास योग्य असे एक प्रशांत व निवाऱ्याचे स्थान आणि जगभरातून येणाऱ्या दर्शनेच्छूसाठी एक यात्रेचे तीर्थस्थान बनून गेले आहे.

माताजी म्हणाल्या, "जगासाठी त्यांनी केवढा प्रचंड स्वार्थत्याग केला आहे हे लोकांना ठाऊक नाही. जवळ जवळ वर्षाभरापूर्वी, त्यांच्याशी काही गोष्टींची चर्चा करताना मी उद्गार काढले, 'मला हा माझा देह सोडावेसे वाटत आहे.' ते अत्यंत ठाम स्वरात बोलले, "छे, हे घडणे कधीच शक्य नाही. या जगत्-परितर्वनाच्यासाठी अवश्य असेलच तर कदाचित मी जाईन; उन्मनीच्या अवतरणाचा आणि जगत-परिवर्तनाचा आपला हा योग तुम्हाला सफळ संपूर्ण करावा लागणार आहे."

माताजींच्या मते श्री अरविंदाचे स्थायी निवासस्थान सूक्ष्म पार्थिवात (पृथ्वीच्या जवळच असलेल्या एका प्रदेशात) असून, ज्यांना त्यांच्या दर्शनाची इच्छा असेल ते सर्वजण तेथे जाऊन त्यांचे दर्शन घेऊ शकतील. या सूक्ष्म पार्थिवातील त्यांचे रूप पृथ्वीवर होते त्यासारखेच आहे. पण आता त्याला अमरत्वाच्या उज्ज्वल शांतीची जोड जाभलेली आहे.

पार्थिव व पार्थिवातीत पातळ्यांवर साधन आणि कार्य चालूच राहिले. श्री अरविंदांनी देह सोडल्यानंतर सहा वर्षांनी एक अत्यंत महत्त्वाची घटना घडली. 1956 हे वर्ष, विशेषतः दिनांक 23 एप्रिल (1956) हा दिवस अत्यंत महत्त्वपूर्ण ठरणार असल्याची एक वदंता श्री अरविंदांच्या परिवारात प्रसृत झाली होती. पण ती घटना, (ज्याची दीर्घकाल प्रतीक्षा) केली ते उन्मनीचे अवतरण, 29 फेब्रुवारी 1956 ला म्हणजेच दोन महिने आधीच घडून आली. तिचे माताजींनी पुढीलप्रमाणे वर्णन केलेः

"आज सायंकाळी दैवी सत्तत्त्व, समूर्त आणि पार्थिव स्वरूपात तुमच्यामध्ये उपस्थित झालं होतं. विश्वाहूनही महान् असं जिवंत सुवर्णमय रूप मला लाभलं होतं; आणि परमेश्वरापासून जगाला अलग करणाऱ्या एका प्रचंड व भक्कम सोनेरी द्वारासम्मुख मी उभी होते. दाराकडे पहात असतानाच, संवित्तीच्या एका अलग व्यापारांत मी ओळखले आणि वांछिलेही की ठरलेली वेळ आली आहे. आणि दोन्ही हातांनी एक भक्कम सोन्याचा हातोडा उचलून मी दारावर एक टोला एकटा एकच, हाणला, आणि त्या दाराचे तुकडे तुकडे झाले. मग उन्मनीची दीप्ती, शक्ती आणि संवित्ती यांचा अविच्छिन्न ओघ खाली पृथ्वीवर कोसळू लागला. 24 एप्रिल 1956 ला माताजींनी ठामपणे संगितले, पृथ्वीवर होणारा उन्मनीचा आविर्भाव हे यापुढे नुसते अभिवचन राहिले नसून, ती एक जिवंत वस्तुस्थिती, एक खरीखुरी घटना होऊन गेली आहे. ती येथे कामाला लागलेली असून एक दिवस असा उजाडेल की सर्वांत आंधळे, सर्वांत अजाण असणाऱ्याना आणि सर्वांत अनिच्छा बाळगणाऱ्यांनादेखील तिचे अस्तित्व मान्य करावेच लागेल."

माताजींनी पुढील संदेश दिला.

"पृथ्वीवर एक नवी प्रभा फाकते आहे.

एक नवीन जग जन्माला आलं आहे.

ज्यांचं अभिवचन दिलं होतं त्या गोष्टी साध्य झाल्या आहे."

चार वर्षानंतर, 29 फेब्रुवारी 1960 ला माताजींनी घोषणा केली, "29 फेब्रुवारी हा यापुढे ईश्वराचा दिवस मानला जाईल."

"स्वामींनी जे काही सांगितलं त्याचं आपण स्मरण ठेवूं या! आपल्याला कधीकाळी यश आलं तर आपण जे करीत आहो तो नुसता प्रारंभ ठरेल, पर्यवसान नव्हे. जिचा अनंत प्रकारांनी आविर्भाव संभवतो अशा एका नवीन संवित्तीची ती पृथ्वीवरील पायाभरणी हीच."

एकदा एका शिष्याने श्री अरविंदांनी काय म्हटलं होतं याकडे माताजींचे लक्ष वेधलं: "पूर्णत्वाप्रत नेणाऱ्या शक्तीच्या एका रूपात उन्मनी, संवित्ती 1967 मध्ये प्रविष्ट होईल." आणि त्याने प्रश्न टाकला 'पूर्णत्वाप्रत नेणारी शक्ती' यांचा नेमका अर्थ काय?" माताजी उत्तरल्या, "माणसांची मने आणि घटनांचा क्रम यावर निर्णायक परिणाम घडवून आणणे." तो संवाद पुढे चालू राहिला.

शिष्य- "माताजीच्या स्वतःच्या पार्थिव अस्तित्वावर पूर्णत्वाप्रत नेणाऱ्या शक्तीचा काय परिणाम घडवून आला आहे? तसेच इतरांवर आणि जगातील आजच्या ठळक समस्यांवर काय परिणाम झाला आहे?"

माताजी-"आपण थोडा धीर धरून प्रतीक्षा करू या म्हणजे मग तो आपल्याला दिसून येईल."

13

# उन्मनी भविष्यकाळ

उन्मनी भविष्यकाळाच्या काही अंगावर प्रकाश टाकणारे माताजींच्या लेखनातले काही छोटे उतारे येथे देत आहोतः

1958 : "उन्मनी तत्त्व आता पृथ्वीच्या वातावरणात सर्वत्र पसरलेले असून ते मध्यवर्ती (मानव) आणि अतिमानव यांच्या आगमनाची जगाच्या परिधातच-सर्वस्वी नवीन निर्मितीची सिद्धता करीत आहे आणि मानसयुक्त मानवाचे त्या नव्या निर्मितीशी जाणते संबंध प्रस्थापित करण्यासाठी त्याच्यावर प्रक्रिया करीत आहे.

जगात अजूनही मला असह्य वाटणारी गोष्ट म्हणजे समग्र शारीरिक ऱ्हास, शारीरिक क्लेश, कुरूपता, प्राणिमात्रात वास करणाऱ्या सौंदर्यक्षमतेला अभिव्यक्त रूप देण्याची असमर्थता, याची समष्टी होय. पण तीवरही एक दिवस विजय मिळवता येईल. माणसाला पार्थिवतेत उतरावेसे जितके अधिक वाटेल, तितकेच त्याला संवित्तीत अधिक वर चढावे लागेल.

जसजशी विश्वाच्या उत्क्रांतीत यापुढे अनुभवावयाच्या उन्मनी जीवनाच्या प्रारंभीच्या कला दृश्य नसल्या तरी सुनिश्चित पद्धतीने विकास पावत आहेत, तसतसं, या उन्मनी जीवनाकडे नेणारी सर्वांत कठीण वाट बौद्धिक व्यापार हीच असल्याचं अधिकाधिक उघड दिसू लागलं आहे.

जगात पसरत जाणाऱ्या व कार्यरत होणाऱ्या या नव्या तत्त्वात इतकी काही उब, शक्ती आणि तृप्ती भरलेली आहे की त्याच्यासमोर सारे बौद्धिक व्यापार निर्जीव आणि नीरस वाटावे.

खऱ्या प्रगाढ प्रितीची एकच एक उसळी, एकटा एक क्षण, ईश्वरी कृपेच्या गाढ संपर्कातले एकटे एक मिनिट, तुम्हाला साऱ्या संभाव्य विवरणांपेक्षा ध्येयाच्या किती तरी अधिक निकट घेऊन जाते.

असेदेखील म्हणता येईल की विशुद्ध, सूक्ष्म, तेजोमय, कुशाग्र आणि खोलवर रुजणाऱ्या अशा काही एका संवेदनेने हे द्वार जितके सताड उघडते तितके सूक्ष्मातिसूक्ष्म स्पष्टीकरणाने उघडत नाही. आणि हा अनुभव थोडा अधिक वृद्धिंगत केला, तर आपण जेव्हा देहाच्या परिवर्तन कार्यापर्यन्त येऊन ठेपतो, ज्या वेळी इतरांहून अधिक सज्ज,

अधिक विशुद्ध, सूक्ष्म आणि लवचिक अशा शरीरातल्या काही पेशींना ईश्वरी कृपेचं, ईश्वरी इच्छेचं, ईश्वरी शक्तीचं, ईश्वराचं अस्तित्व मूर्त स्वरूपात जाणवू लागतं-हे जाणणं बौद्धिक नसून सरूपतेमुळे लाभलेलं असतं-हे जेव्हा तुमच्या शरीरातल्या पेशीच्याही अनुभवास येतं, तेव्हा तो अनुभव इतका परिपूर्ण, इतका अनिवार्य, इतका जिवंत, इतका समूर्त आणि इतका सत्य असतो की बाकीचं सारं काही निरर्थक स्वप्नासारखं भासू लागतं."

"स्वतःच्या शरीराद्वारा जाणल्यावाचून कोणाला कधीच काही समजून येत नाही असंच दिसून येईल."

1959 : "तुम्हाला त्याची जाणीव असो वा नसो, किंवा तुम्हाला त्याची इच्छादेखील असो वा नसो, तुम्ही या क्षणाला, या पृथ्वीवर जगत आहात या प्रत्यक्ष वस्तुस्थितीपायीच, जगाच्या वातावरणात पसरत असलेल्या या नव्या उन्मनी तत्त्वाचं शोषण तुम्ही श्वासाने जो वायू घेता त्याच्याबरोबरच तुम्ही करीत असता आणि तुम्ही हे निर्णायक पाऊल उचलताक्षणीच आकस्मितपणे आविर्भूत होणाऱ्या वस्तूत ते तत्त्व उद्भूत होत असतं."

1961 : "एखाद्याचा उन्मनीशी संबंध प्रस्थापित झाल्याचं दोन, खोडून न काढता येण्याजोग्या, चिन्हांवरून सिद्ध होतंः 1. संपूर्ण व सततची समता; 2. ज्ञानाविषयी निरपेक्ष निश्चिती."

"सर्वांगपरिपूर्ण होण्याच्या दृष्टीने, ही समता सर्व प्रकारच्या परिस्थितीत, साऱ्या घटनांत, सर्व प्रकारच्या संबंधात, (मग ते भौतिक असोत किंवा मानसिक असोत) तसेच त्यांचे स्वरूप व परिणाम कोणत्याही प्रकारचे असोत, (ही समता) अविकारी, उत्स्फूर्त व प्रयत्नावाचून साध्य होणारी असायला हवी."

1963 प्रश्नः "आता उन्मनी पृथ्वीवर अवतरलेली आहे, त्या अर्थी जन्माच्या रहाटीतून गेल्याविनाही सरळ तीत परिर्वतन शक्य होईल का?"

उत्तरः "ते शक्य आहे का? काहीही शक्य आहे. तुम्हाला काय जाणून घ्यायचं आहे?-ते अगोदरच घडूनही आलेलं आहे की काय हे?"

उत्तरः "सर्वांत पार्थिव स्तरापर्यंत नाही; पण सूक्ष्म पार्थिवाला गोचर (अशा स्वरूपात) ही पार्थिव इंद्रिये आणि सूक्ष्म पार्थिवातील इंद्रिये यांच्या मध्यस्तरावरील इंद्रियांना गोचर; उदाहरणार्थ, माणसाला जाणवणाऱ्या श्वासासारखं, मंद झुळुकीसारखं, सुगंधी पदार्थांच्या मंद सुवासासारखं. अर्थातच ज्यांना अंतश्चक्षू लाभले आहेत, त्यांनाच केवळ हे पाहाता येईल. पण सर्वांत पार्थिव इंद्रियांविषयी सांगायचं तर, आपल्याला ते पार्थिव मार्गाने कळत असल्यामुळे, त्यांना पार्थिव देहाद्वारा शाश्वतता लाभलेली नसते. चमत्कार घडून येतात, साक्षात्कारदेखील होतात हे खरं पण ते भंगुर स्वरूपाचे असतात. वस्तुतत्त्वाची स्थिरता, शाश्वतता तेवढी त्यांना लाभलेली नसते."

1965: "विवेकानंदांना शिवाची विभूती (अवतार) म्हणतात. पण शिवाने तर उन्मनी लोकाच्या जोडीनेच आपण जगात येणार असल्याचं स्पष्ट शब्दांत सांगितलं होतं.

पृथ्वी उन्मनी जीवनासाठी सज्ज होईल तेव्हा तो अवतीर्ण होईल. आणि जवळ जवळ हे सारेच प्राणी स्वतः होऊन प्रकट होतील-ते त्या क्षणाचीच प्रतीक्षा करीत आहेत. वर्तमान युगातील संघर्ष व क्लिष्टता त्यांना नकोशी वाटते."

1966 : "लोकांना तर घाई झाली आहे, त्यांना फलिते तात्काळ दिसायला हवी आहेत. आणि मग त्यांना असा विश्वास वाटतो की आपण उन्मनीलाच खाली खेचून घेत आहोत-(वस्तुतः ते एखादं क्षुल्लक प्राणमय व्यक्तित्व खाली खेचत असतात; ते त्यांना खेळवतं आणि त्यांना एखादं घाणेरडं प्रहसन करायला भाग पाडतं.)"

"पण जिला श्री अरविंद उन्मनी म्हणतात ती खरी शक्ती तुम्ही सर्व प्रकारच्या संपूर्ण अहंकारातून सर्वस्वी मुक्त झाल्यावाचून आविर्भूत होणे शक्यच नाही. त्यामुळे तिचा दुरुपयोग होण्याचे भय मुळीच नाही. सर्वांग परिपूर्ण आंतरिक अनासक्तीद्वारा जो पूर्णत्वाप्रत पोचला आहे अशा जीवाव्यतिरिक्त ती दुसऱ्या कोणत्याही माध्यमातून अभिव्यक्त होणार नाही. श्री अरविंदांनी आपण जे करावे अशी अपेक्षा केली ते हेच असल्याचे मी तुम्हाला सांगितलेलं आहे-तुम्ही मला सांगाल की ते कठीण आहे; पण मी फिरून सांगते, आपण येथे आलो ते सोप्या गोष्टी करण्यासाठी नव्हे, तर कठीण गोष्टी करण्यासाठीच आपण येथे आलो आहोत.''

1968 : "अत्यल्प घर्षणानिशी एकाच वेळी सर्वत्र प्रविष्ट होणाऱ्या शक्तींमध्ये शरीर जणू काही न्हाऊन निघत असल्यासारखे सर्व देहात उन्मनी शक्तीचा प्रभावी आणि दीर्घकालीन आंतरिक रिघाव (घडून यायला हवा); डोक्यापासून मानेपर्यंतचा भाग हा सर्वांत कमी ग्रहणशील असतो." (माताजींनी हे 26-27 डिसेंबर 1968 च्या एका टिप्पणीत लिहिलेलं आहे.)

1969 : "1 जानेवारी 1969 ला, पहाटे दोन वाजता, पृथ्वीच्या वातावरणात अवतीर्ण होऊन ईश्वरी संवित्ती तिथेच स्थिर झाली. हे अवतरण पराकाष्ठेचं अद्‌भुत, दीप्ती, ऊर्जा शक्ती व आनंद यांनी खचलेलं असं होतं आणि त्यानं साऱ्या पृथ्वीला उजाळा दिला होता."

"अतिमानव नामक एका नव्या निर्मितीसाठी मानवाला सज्ज करण्याच्या दृष्टीने या वर्षाच्या आरंभापासूनच एक नवी संवित्ती पृथ्वीतलावर कार्यमग्न झालेली आहे. ही नवनिर्मिती शक्य होण्यासाठी मानवी शरीर ज्या तत्त्वांचे बनलेले आहे त्यांत महान परिवर्तन घडून यायला हवे आहे, ते संवित्तीच्या ग्रहणास अधिक समर्थ आणि तिच्या कार्यासाठी अधिक लवचिक बनले पाहिजे."

"उन्मनी सृष्टीत यापुढे धर्म असणार नाहीत. सारे जीवन जगात अविर्भूत होणाऱ्या ईश्वरी ऐक्याचा आविष्कार, त्याला विभिन्न रूपात आलेला मोहोर होऊन बसेल. आणि माणसं आज ज्यांना देव म्हणतात तेही या पुढे असणार नाहीत. या थोर विभूती स्वतःच नवनिर्मितीत सहभागी होऊ शकतील; त्यासाठी ज्याला पृथ्वीतलावरील उन्मनी तत्त्व असे

म्हणता येईल, ते त्यांना धारण करावे लागेल. आणि आहोत तसे स्वतःच्याच विश्वात रहाणे अधिक बरे असे मानणारे कोणी असतील आणि ते पार्थिव स्वरूपात प्रगट न होण्याचा निर्णय घेतील, तर उन्मनी जगातील पृथ्वीतलावरील इतर जीवांशी त्यांचं नातं मैत्रीचं, सहकार्याचं, समतेचं असेल, कारण पृथ्वीतलावरील नव्या उन्मनी जगातील जीवांत आता सर्वोच्च ईश्वरी तत्त्व आविर्भूत झालेले असेल.

"पार्थिव द्रव्यांचे उन्मनीकरण होईल तेव्हा देह धारण करून पृथ्वीवर जन्मास येणे कमीपणास कारणीभूत होणार नाही, तर उलट अन्यथा न लाभणाऱ्या परमोत्कर्षाचाच लाभ तेथे झालेला आढळेल.

"हे सारेच भविष्यकालीन आहे; त्या भविष्यकाळाला आरंभ झालेला असला, तरी स्वतःला एकात्मतेप्रत नेण्यास त्याला अवधी लागणार आहे. मध्यंतरीच्या काळात आपण पूर्वी कधीही न संभवलेल्या अशा एका वैशिष्ट्यपूर्ण, परिस्थितीत जगत आहोत. एका नव्या जगाच्या जन्मकाळी आपण (सेवाशुश्रूषेसाठी) उपस्थित आहोत. हे जग सर्वस्वी कोवळं, सर्वस्वी दुबळं सारतत्त्वाच्या अंगाने नव्हे, तर बाह्य दृश्य स्वरूपाने दुबळं, त्याची अजून ओळख पटलेली नाही, जाणीवही झालेली नाही, कित्येकांना त्याची अजून ओळख पटलेली नाही, जाणीवही झालेली नाही, कित्येकांनी त्याचे सत्यत्व नाकारलेही आहे; पण ते अस्तित्वात आहे. ते अस्तित्वात असून वृद्धिंगत होण्याचे प्रयत्न करीत आहे. आणि फलनिष्पत्तीचीही त्याला निश्चिती वाटते. परंतु तिथे पोचण्याचा रस्ता नवीन असून तो यापूर्वी कधीच चोखाळलेला नाही, त्याने कोणीच गेले नाही. छे, तसे कोणी केलेच नाही. तो नुसता शुभारंभ आहे, विश्वव्यापी शुभारंभ. आणि म्हणूनच तो एक अगदी अनपेक्षित आणि अकल्पित असा साहसी उपक्रम ठरतो."

14

# स्वामी व मार्गदर्शक

"उपदेश, उदाहरण आणि प्रभाव ही तीन गुरूंची साधने होत".

*-श्री अरविंद*

श्री अरविंदांनी 7 एप्रिल 1920 ला आपला धाकटा भाऊ बारीन याला लिहिलेल्या एका पत्रात गुरूच्या भूमिकेचे काहीसे दिग्दर्शन केले आहे. "प्रथम तुझ्या योगासंबंधी. आपला योग माझ्यावर सोपविण्याची तुझी इच्छा आहे. आणि मी तो स्वीकारण्यास, म्हणजेच गुप्तपणे वा प्रगटपणे मला आणि तुला, दोघांनाही, स्वःतच्या गूढ शक्तिद्वारा जो चालना देत असतो त्यावर सोपविण्यास राजी आहे. पण तू हे मात्र लक्षात घ्यायला हवेस की त्याचे अटल पर्यवसान म्हणून, ज्याला मी एकात्म योग म्हणतो आणि जो मला ईश्वरानेच दिलेला आहे त्या वैशिष्ट्यपूर्ण मार्गाचेच अनुसरण तुला करावे लागेल."

दुसऱ्याही एका प्रसंगी श्री अरविंदांनी विवरण केले होते, "जो एका उच्चतर संवित्तीप्रत व जीवनाप्रत पोचला असेल तो स्वामी (गुरू) आणि कित्येकदा त्यालाच त्या संवित्तीचा आविष्कार अथवा प्रतिनिधी मानतात. तो स्वतःच्या उपदेशद्वारा,व त्याहूनही अधिक स्वतःच्या प्रभावाद्वारा आणि उदाहरणाद्वाराच केवळ नव्हे, तर स्वतःचा अनुभव इतराप्रत पोचविण्याच्या शक्तिद्वाराही सहाय्यभूत होत असतो."

आध्यात्मिक मार्गदर्शनाविषयी माताजींची भूमिका श्री अरविंदाच्याच भूमिकेशी एकरूप होती. श्री अरविंद म्हणतात, "त्यांचे ज्ञान, शक्ती आणि त्यांची संवित्ती यांच्या बाहेर राहून काहीच करणे शक्य नाही. त्यांची संवित्ती एखाद्याला खरोखरीच जाणवेल, तर त्याने मीही तिच्या मागे आहे असे ओळखावे आणि आधी मी जाणवलो तरीही त्यांच्या संवित्तीसंबंधीही हेच सत्य आहे.

"साऱ्याच योगविद्यांत, विशेषतः एकात्म योगात स्वामीची प्रेरणा, आणि अधिक कठीण अवस्थांत त्यांचे नियंत्रण आणि सान्निध्य याची अपरिहार्य निकड असते. नाहीतर यशप्राप्तीचा सारा संभवच नाहीसा करणाऱ्या बऱ्याचशा चुका आणि ठेचा यांवाचून त्यातून पार पडणे अशक्यच होईल."

श्री अरविंदांपुरते सांगायाचे तर, त्यांनी स्वतःच्या शिष्यांना सहाय्य आणि मार्गदर्शन

कसे केले हे त्यांचा पत्रव्यवहार आणि त्यांची सायंकालीन व्याख्याने यांमधून अगदी अत्यल्प अंशमात्राने व्यक्त होते. त्याचे बहुतेक सारे सहाय्य आंतरिक विचारसंक्रमण आणि आंतरिक व्यापार यांच्याद्वारा होत असे.

श्री अरविंदांनी म्हटले आहे,"गुरू म्हणजे स्वतःच्या भावंडांना सहाय्य करणारा मनुष्य, बालकांचं नेतृत्व करणारं बालक, इतर ज्योती पेटविणारी ज्योत, (इतर) आत्म्यांना जागृत करणारा जागृत आत्मा."

...ते सर्वकाळ करीत असत ते हेच. आपल्या साऱ्या अडचणी त्यांनी शिष्यांपुढे उघड केल्या होत्या.

त्यांनी आपल्या एका पत्रात स्पष्टीकरण दिले आहे,"आमच्या येथील योगाला इतरांपेक्षा निराळाच उद्देश आहे; कारण सामान्य अज्ञानी जग संवित्तीतून बाहेर पडून उन्नती साधणे एवढेच त्याचे ध्येय नसून, मन, जीवन व देह यांत परिवर्तन घडवून आणण्यासाठी, त्यांच्या अज्ञानावरणात ईश्वरी संवित्ती उतरवून आणणे, इहलोकी ईश्वराचा आविष्कार घडविणे आणि वस्तुतत्त्वांत ईश्वरी जीवन निर्माण करणे हे आहे. हा एक पराकाष्ठेचा दुःसाध्य उद्देश व अत्यंत दुःसाध्य योग आहे. पुष्कळांना किंवा बहुतेकांना ते अशक्यच वाटेल. सामान्य अज्ञानी जगत्संवित्तीच्या साऱ्या सुप्रतिष्ठित शक्ती त्यांच्या विरुद्ध असून त्या तो अमान्य करतात आणि त्यात अडथळे आणू पाहातात. आणि आपलं स्वतःचंच मन, जीवन आणि तन त्याच्या साफल्याला विरोध करणाऱ्या सर्वांत दुर्दम्य अशा अडथळ्यांनी भरलेलं असल्याचंही साधकाला आढळून येईल, तुम्ही हे उद्दिष्ट पूर्ण मनोभावाने स्वीकारू शकाल, साऱ्या अडचणींना तोंड देऊ शकाल, भूतकाल व त्याचे पाश मागच्या मागेच सोडून देऊन, या ईश्वरीय साध्यासाठी सर्वस्वाचा त्याग करण्यास आणि सर्वस्व पणाला लावण्यास सिद्ध व्हाल, तरच त्यामागील सत्य स्वानुभवाद्वारा शोधून काढण्याची आशा तुम्हाला बाळगता येईल.

ठराविक चाकोरीतले मानसिक शिक्षण, ध्यानाच्या विहित पद्धती, मंत्र किंवा दुसरे काही तरी, यातून योगाचा आरंभ होत नसून, आकांक्षा अंतर्मुख आणि ऊर्ध्वमुख आत्मैकाग्र्य, आापल्यावरची ईश्वरी शक्ती व तिचे कार्य, तसेच हृदयातील ईश्वरसंनिधान या सर्वांच्या प्रभावाच्या स्वीकारार्थ स्वतःची तत्परता आणि या गोष्टीशी विसंवादी असलेल्या सर्व गोष्टींचा त्याग यांमधून होत असतो. स्वतःची अशी तत्परता, श्रद्धा, आकांक्षा व आत्मनिवेदन यांद्वाराच लाभू शकेल."

श्री अरविंदांना इहलोकातच ब्रह्मज्ञान हवे होते. ईश्वराने हे जग जिंकायला, या जगाच्या साऱ्या हालचाली जिंकायला, आणि इहलोकीच ईश्वराचा साक्षात्कार घडायला हवा होता. त्यांचा स्वतःचा साक्षात्कार ही तर उन्मनीची दारे जगताच्या संवित्तीसाठी उघडून देणारी नुसतीच किल्लीच होती. शिष्यांनी या महान कार्यात सहकार्य देण्याच्या दृष्टीने व्यक्तिशः काय करायला हवे होते? त्या साधनाचे विवरण ते करतात. "साधन

म्हणजे संवित्तीची दारं ईश्वरासाठी मोकळी करणे, वर्तमान संवित्तीचे मानसिक व आध्यात्मिक संवित्तीत रूपांतर घडवून आणणे. प्रस्तुत योगात त्याचा अर्थ, ईश्वराने स्वामित्व प्रस्थापित करून उपयोग करावा यासाठी आणि परिवर्तनासाठीही, समग्र संवित्ती व तिचे व्यापार ईश्वरास समर्पित करणं, असाही आहे. आणखी एका संदर्भात (ते म्हणतात) "या गोष्टीत प्रविष्ट होण्याचा खरा मार्ग, मनाला स्थिर करणे आणि जिच्याद्वारा सारी कार्ये होतात त्या संवित्तीसाठी उघडून देणे हाच होच. मग पहिल्यांदा तुम्हाला ईश्वरी संवित्ती निरनिराळ्या स्तरांवर कार्य कसे करते याचा प्रत्यक्ष अनुभव मिळेल आणि मग त्या अनुभवा संबंधीची ज्ञानज्योतीही (लाभेल). हा एकच खरा मार्ग आहे. बाकीचं सारं म्हणजे नुसते खेळ किंवा मनाचं वांझोटं तर्कट."

ते आपल्या शिष्यांना त्यांच्या साहित्यिक व अन्य कार्यांतही सहाय्य करीत. त्यांच्या शक्तीच्या दाबाखाली शिष्यांच्या सुप्त शक्ती वृद्धिंगत होत आणि जणू एखाद्या अद्‌भुत चमत्काराने ते लोक नाटककार, कवी, चित्रकार इत्यादी नात्यांनी विकास पावत. ही प्रक्रिया त्यांनी एका पत्रात विशद केली आहेः "होय, अर्थातच, मी 'जे' सहाय्य करीत आलो आहे, कोणाला तरी स्वतःची साहित्यिक प्रतिभा विकासित करण्याची इच्छा खरोखरीच असते तेव्हा मी त्याच्यावर किंवा तिच्यावर काही एक शक्ती सहाय्यार्थ योजतो. मुळात शक्ती, मग ती शक्ती कितीही सुप्त असो, आणि चिकाटी असेल तर ती सतत त्या दाबाखाली वाढत रहाते आणि या किंवा त्या दिशेला ती वळवताही येते. काही जण स्वभावतःच या शक्तीचे आधार बनण्यास इतरांहून अधिक पात्र असतात आणि ते अधिक निश्चितपणे व झपाट्याने विकासही पावतात. इतर मात्र चिकाटीचं अवश्य ते बळ नसल्याकारणाने, मधेच गळून जातात. पण ग्रहण करणाऱ्या व्यक्तीचं सहकार्य असेल आणि मानवी मनातील अप्रवृत्ती (कार्योत्साहाचा अभाव) व अप्रकाश (ज्ञानाचा अभाव) एवढेच तम जिंकायचे असेल, तर सर्वसाधारणपणे ही प्रतिभा विकसित करणे खूपच सोपं जातं. कारण मानवी मनाच्या प्रवृत्तीतले हे अडथळे, कळकळीचा विरोध किंवा इच्छाशक्तीचं असहकार्य किंवा विरुद्ध दिशेने दाब अथवा प्रगती चालू असताना व्यक्तीसमोर संघर्षाला उभ्या ठाकणाऱ्या कल्पना, ही या अडथळ्यांइतकी गंभीर नसतात."

लेखन-किंवा खरं पाहिलं तर कोणतंही काम-योगाचं रूप कसं पावू शकतं याचं विवरण करणारं श्री अरविंदांचं शिष्याला धाडलेलं हे आणखी एक पत्र—"ईश्वरी प्रेरणेतून आणि ईश्वरासाठीच लिहावयाचं हे तुमचं ध्येय असेल, तर तुम्ही सारं लेखन आंतरिक प्रेरणेचा प्रति प्रेरणेचं सहाय्य होत नसेल तेव्हा संपूर्ण लेखन मूलस्रोत व त्याचे उद्देश्य यांना अनुरूप बनविण्यासाठी तुम्ही आपल्या कामाकडे परतायला हवं. काव्य कला, संगीत यांपासून तो सुतारकाम, रोट्या भाजणं किंवा खोलीचा केर काढणं, यांसारखी ईश्वराप्रीत्यर्थच केलेली सर्व कामे त्यांच्या अगदी क्षुल्लक बाह्य उपांगाच्या दृष्टीनेही, तसेच ती ज्या निष्ठेने करावयाची तिच्या दृष्टीनेही निर्दोष करायला हवीत.

कारण मगच ते कार्य म्हणजे सर्वतोपरी उचित असं समर्पण ठरेल."

श्री अरविंदांच्या योगात कर्म हा साधनेचा अविभाज्य घटक आहे. एकदा त्यांनी सांगितले, "जे माताजीसाठी पूर्ण आस्थेने काम करतात, ते ध्यानाला बसले नाहीत किंवा त्यांनी योगाचा विशिष्ट मार्गही चोखाळला नाही, तरी नुसत्या त्या कामामुळेच उचित संवित्तीसाठी सज्ज होत असतात.

जे शांतीने आणि समतेने रहातात, माताजींसाठी मात्र काहीच काम करीत नाहीत, किंवा अत्यल्प काम करतात, त्यांना परिवर्तन लाभते का या प्रश्नास उत्तर देताना श्री अरविंदांनी ठामपणे सांगितले, "नाही, त्यांच्यात मुळीच परिवर्तन घडून येत नाही."

आपल्या शिष्यांनी जे करावं अथवा बनावं अशी गुरूंची इच्छा असेल, त्याचे उदाहरण स्वतः गुरूंनीच प्रथम घालून द्यायला हवे. माताजींनी श्री अरविंदासंबंधी एक गमतीची घटना उल्लेखिली आहे. खरीखुरी संवित्ती प्रत्यक्ष शरीरातच जतन करणे व थोडीदेखील भीती न बाळगणे आणि ईश्वरी शांतीने भरून रहाणे हीच महत्त्वाची गोष्ट होय. मग खरोखरीच भीती उरत नाही. केवळ मानवाचीच नव्हे, तर पशुंचीसुद्धा चढाई पूर्वसूचना मिळाल्याने टाळता येते आणि अगदी पंचभूतांवरदेखील परिणाम घडवता येतो. मला एक लहानसं उदाहरण देता येईल. त्या भीषण वादळी रात्रीची आठवण तुम्हाला असेल, प्रचंड गडगडाट चालला होता आणि जिकडे तिकडे पावसाची झड कोसळत होती. मी विचार केला, "आपण श्री अरविंदांच्या खोलीत जावं आणि त्यांना खिडक्या बंद करू लागावं.' त्यांचं दार मी उघडलं मात्र अन् मला आढळलं की ते शांतपणे आपल्या लेखनपेटिकेवर (डेस्कापाशी) लिहीत बसले आहेत. त्या खोलीत इतकी भरीव शांतता होती की बाहेर वादळाने धुमाकूळ चालवला आहे अस कुणाच्या स्वप्नातदेखील आलं नसतं. साऱ्या खिडक्या सताड उघड्या होत्या, पण पावसाचा मात्र एक थेंब देखील आत येत नव्हता."

आंतरिक व बाह्य सृष्टिविषयक अशा सर्व प्रकारच्या समस्यांना सामावून घेणारे मन कुंठित करण्यासारखे आणि न सुटण्यासाखे भासणारे नानापरीचे प्रश्न विचारणारी सहस्रावधी पत्रे श्री अरविंदाकडे धाडली जात. आणि ते आंतर व बाह्य दोही परींनी, त्याची प्रत्युत्तरेही देत. सहाय्य आणि परिवर्तन अशी शक्तीही प्रत्येक पत्रात समाविष्ट असे. काही थोडी पत्रे खाली उध्दृत केली आहेत.

आपल्या कामात ताण, थकवा अनुभवणाऱ्या एका शिष्याला (ते लिहितात), "आपल्या कामाचा विचार, ते चालू असेल तेव्हाच केवळ करा; आधीही नको आणि नंतरही नको. मनाला, संपवलेल्या कामाकडे माघारी वळू देऊ नका. ते भूतकाळात जमा झालेले असल्याने ते फिरून हाती घेणे म्हणजे शक्तीचा अपव्ययच होय. पुढे करावयाचे कष्ट आपल्या मनाला करू देऊ नका. तुमच्या ठायी व्यापारणारी कार्यशक्ती योग्य वेळी त्या कामाकडे पाहीलच.

परिवर्तनकारी शक्ती भूतकाळातलं जे काही कार्य दूर सारण्यासाठी झटत असते त्याच्याशी मनाच्या या दोन सवयी निगडित झालेल्या असतात आणि त्यांच्यात मग्न होण्याचा पार्थिव मनाचा हट्ट तुमच्या ताणाला आणि थकव्याला कारणीभूत होत आहे. मनाचं कार्य आवश्यक असेल तेव्हाच केवळ त्याला काम करू द्यायचं हे लक्षात ठेवाल तर तो ताण कमी होत नाहीसाही होईल. खरोखरी उन्मनीच्या व्यापारांनी पार्थिव मनावर वर्चस्व प्रस्थापित करून त्याच्या ठायी ज्ञानज्योतीची स्वयंस्फूर्त क्रियाशीलता निर्माण करण्यापूर्वीच्या संक्रमणकालात घडून येणाऱ्या या हालचाली असतात."

दुसरा एक शिष्य स्वतःच्याच ठायी बसणाऱ्या चुकीच्या व्यापारातून मुक्त होणे फारच कठीण जात असल्याकारणाने श्री अरविंदांकडे वळला होता. श्री अरविंदांनी उत्तर दिले, "तुमच्यावर आक्रमण करू पाहाणाऱ्या अडचणींचं आणि चुकीच्या व्यापारांचं निवारण करण्याच्या खटपटीत, तुम्ही बहुधा त्यांच्याशी अतिशय तादात्म्य पावण्याची, आणि त्यांना आपल्या स्वतःच्या स्वभावाचेच घटक मानण्याची, चूक करीत असणार. त्याऐवजी तुम्ही त्यांच्यापासून मागे सराल, अलिप्त व्हाल आणि त्यांच्या स्वतःच्याच संबंध तोडून आणि आपल्या अंतरंगात प्रवेश करून आपल्याला त्यांच्या स्वतःच्याच अभिव्यक्तीचं साधन बनवू पाहाणाऱ्या शक्ती, विश्वातील निम्नतर, अपूर्ण (सदोष) आणि अशुद्ध अशा प्रकृतीचे व्यापार या नात्याने त्यांजकडे पाहाल, तर बरं. अशा रीतीने त्यांच्या पासून स्वतःस अलग करून त्यांचा संबंध तोडल्यामुळे, तुम्हाला स्वतःच्या व्यक्तित्त्वाच्या काही भागाचा शोध घेऊन व त्यातच वाढत्या प्रमाणात मग्न होऊन जीवन कंठता येईल, हे व्यापार तुमच्या आंतर व मानस जीवनावर आक्रमण करून त्याला संत्रस्त करीत नाहीत व त्यामुळे ते आपल्याला परके असल्याचं त्याला आढळून आल्यावर ते आपोआपच त्यांना मान्यता देण्यास नकार आणि आपण स्वतः ईश्वरी शक्तींकडे आणि संवित्तीच्या उच्चतर स्तरांकडे वळलेले असल्याचं, त्यांच्या संपर्कात असल्याचंच त्याच्या सतत अनुभवास येतं. आपलया जीवनाच्या या अंशाचा शोध घ्या आणि त्यातच जीवन व्यतीत करा. असे करण्यास समर्थ होणं हाच या योगाचा खराखुरा पाया आहे."

या प्रतिद्वंदी शक्तींची भूमिका नेमकी काय होती? साधकांच्या मार्गात अडचणी उत्पन्न करण्याची मोकळीक त्यांना का दिली जात होती? असा प्रश्न दुसऱ्या एका साधकाने टाकला. श्री अरविंद उत्तरले, या प्रतिद्वंद्वी शक्तींनी स्वतःचं म्हणून काही काम स्वतःच निवडलेलं असतं, ते म्हणजे, व्यक्तीची, कार्याची, प्रत्यक्ष पृथ्वीची, तसेच ईश्वरी अवतरण आणि साफल्य यांसाठी त्यांनी मिळवलेल्या सज्जतेची पारख करणे. त्या वाटचालीतल्या पावलागणिक, त्वेषाने चढाई करीत, टीका करीत, सूचना देत, धाकधूक निर्माण करीत, किंवा विद्रोह भावना जागवीत, अश्रद्धा उंचावीत, अडचणींची रास रचीत त्या (शक्ती) उभ्या असतातच. आपल्याला आपल्या कार्यानुरोधाने मिळालेल्या अधिकारातून त्या अतिशयोक्त अर्थ काढतात आणि आपल्या दृष्टीने जे वारुळ असतं त्याचाही त्या

पर्वत करतात, यांत संदेह नाही. एखादंच लहानसं, क्षुल्लक चुकीचं पाऊल किंवा प्रमाद (दिसताच), त्या मार्गात अवतीर्ण होतात आणि त्यावर समग्र हिमालयच अडथळा म्हणून उभं करतात. पण या विरोधाला तर अगदी पुरातन काळापासून मोकळीक दिलेली आहे, केवळ एक परीक्षा किंवा दिव्य म्हणूनच नव्हे, तर अधिक महान शक्ती, अधिक परिपूर्ण आत्मज्ञान, अधिक गाढी श्रद्धा, ईश्वरी कृपेचे समर्थतर अवतरण प्राप्त करण्यास झटण्यासाठी आपल्याला (ही मोकळीक दिलेली आहे).

दुसऱ्या एकाला त्यांनी बजावले, "मनाची प्रतिकारशून्य अकर्मण्यता असते चांगली, पण प्रतिकारहीन रहावयाचे ते केवळ सत्याच्या आणि ईश्वरी शक्तीच्या स्पर्शाच्याच संदर्भात, एवढी मात्र काळजी घे. निम्नतर प्रकृतीच्या सूचना आणि प्रभाव यांच्याही संदर्भात प्रतिकारहीन रहाशील तर मात्र तुला प्रगती तरी साधता येणार नाही, किंवा तू स्वतःवर प्रतिद्वंदी शक्तींचं आक्रमण तरी ओढवून घेशील आणि त्या तुला योगाच्या खऱ्या मार्गापासून खूपच दूर नेतील."

एका शिष्याला स्थैर्य, शांती व शरणागती आधीच लाभली होती, पण काम करताना त्या टिकवणे मात्र त्याला कठीण जात असे. त्याने आपल्या अडचणी श्री अरविंदांपुढे ठेवल्या. उत्तर आले, 'साधनाचा खराखुरा पाया शेवटी तुम्हाला लाभला. ज्ञान, बळ व आनंद या पुढे लाभणाऱ्या अनुभूतींच्या दृष्टीने, ही स्थिरता, शांती व शरणागती म्हणजे अनुकूल वातावरणच होय. ती अवस्था परिपूर्ण होऊ द्या. कामात गुंतलेलं असताना ती टिकून राहात नाही. कारण ती अद्याप प्रत्यक्ष मनापुरतीच सीमित आहे आणि त्याला तर निःशब्दतेचं वरदान नुकतंच लाभलेलं आहे. ही नवीन संवित्ती पूर्णरूपाने साकार होईल आणि प्राणमय प्रकृती व पार्थिव जीवन यांवर परिपूर्ण स्वामित्व प्रस्थापित करील (आजवर त्या शांतीने प्राणमयाला हा नुसता स्पर्श केलेला आहे, किंवा ती त्याच्या वरचढ झाली आहे, पण अजून तिने त्याला आत्मसात मात्र केलेले नाही.) तेव्हाच ही उणीव नाहीशी होईल.

"आज तुमच्या मनाला लाभलेली शांत संवित्ती केवळ स्थिरच नव्हे, तर व्यापकही व्हायला हवी. ती तुम्हाला सर्वत्र जाणवली पाहिजे; तुम्ही स्वतः तिच्यातच आणि सारेच तिच्यात. कार्यात पाया या नात्याने स्थैर्याची स्थापना होण्याच्या दृष्टीने हेही उपकारक ठरेल.

"तुमची संवित्ती जितकी अधिकाधिक व्यापक बनेल तितके वरून शक्तिग्रहण करण्यास तुम्ही अधिकाधिक समर्थ व्हाल. शक्ती अवतीर्ण होऊ शकेल आणि शरीरयंत्रणेत शांतीप्रमाणेच बळ व दीप्ती ओतू शकेल. स्वतःच्या ठायी जे काही संकुचित आणि सीमित असल्यासारखे तुम्हाला वाटते ते तर तुमचे पार्थिव मन. हीच व्यापकतर संवित्ती आणि ईश्वरी दीप्ती अवतीर्ण होऊन प्रकृतीला आत्मसात करतील तरच ते मन विशाल होऊ शकेल."

"शरीरयंत्रणेत वरची शक्ती अवतीर्ण होईल, तेव्हाच तुम्हाला त्रस्त करणारी पार्थिव अकर्मण्यता कमी होऊन नष्ट होण्याचा संभव उद्‌भवेल."

"स्तब्ध रहा, स्वतःला ग्रहणार्थ सज्ज ठेवा आणि ती स्थिरता व शांती दृढतर करण्यासाठी, संवित्ती व्यापक बनविण्यासाठी आणि ती आज जेवढी ग्रहण व आत्मसात करू शकेल तेवढी दीप्ती व शक्ती तीत ओतण्यासाठी ईश्वरी शक्तीला आवाहन करा."

"अधीरतेचा अतिरेक न होऊ देण्याची मात्र काळजी घ्या, कारण तीमुळे जो काही स्थिरपणा आणि समतोल प्राणमय प्रकृतीत आधीच सुप्रतिष्ठित झालेला आहे तोही बिघडून जाईल. अंतिम परिणतीचा भरवसा बाळगा आणि शक्तीला तिचं काम पार पाडायला अवधी द्या."

दुसऱ्या एका शिष्याकडून कोणत्या तरी प्रकारचा अतिक्रम घडला होता आणि तो निष्कृतीसाठी मार्गदर्शन घेण्यास श्री अरविंदांकडे आला. खाली उधृद्त केलेल्या त्यांच्या पत्रात खऱ्याखुऱ्या निष्कृतीचं (प्रायश्चित्ताचे) विवरण केलेलं आहे (ईश्वराशी अधिक तादात्म्य).

"तुम्ही जो अपराध केलेला दिसतो, त्याचे निराकरण कसं करता येईल हे तुम्हाला जाणून घ्यायचं आहे. परिस्थिती तुम्ही सांगता तशीच आहे असं मानल्यास माझ्या दृष्टीनं निष्कृती नेमकी पुढील गोष्टीत सामावलेली आहे. ईश्वरी सत्य आणि ईश्वरी प्रीती यांकरिता स्वतःस सत्पात्र बनवा. निःशेष आत्मैकाग्र्य व आत्मशुद्धी, स्वतःला ईश्वरासमोर पूर्णतया अनावृत करणं, उद्दिष्टसिद्धीच्या मार्गात आडव्या येऊ शकणाऱ्या स्वतःच्या ठायींच्या सर्व वृत्तींचा त्याग करणं या त्या दिशेच्या पहिल्या पायऱ्या होत. आध्यात्मिक जीवनात कोणत्याही चुकीला दुसरं कोणतंही प्रायश्चित्त नाही, निदान पूर्णतया परिणामकारक असं कोणतंच नाही. हा आंतरिक विकास आणि हे परितर्वन यांपलीकडे प्रारंभी माणसाने दुसरे कोणतेही फल किंवा परिणती अपेक्षू नये, कारण एरवी मनुष्य स्वतःवर तीव्र निराशेचा प्रसंग ओढवून घेतो. मनुष्य स्वतः स्वतंत्र असतो तेव्हाच तो दुसऱ्यांना मुक्त करू शकतो आणि योगात तर बाह्य विजय लाभतो तो आंतरिक विजयातूनच."

श्री अरविंदांनी स्वतःचं व्यक्तिगत मत दुसऱ्यावर कधीच लादलं नसलं तरी ते सर्व विषयांसंबंधी मार्गदर्शन मात्र करीत असत. त्यांच्या विवाहविषयक मतांसाठी विनंती करणाऱ्या एका शिष्याला धाडलेल्या पुढील पत्रात त्यांच्या मार्गदर्शनाची वैशिष्ट्ये प्रकट झालेली दिसतीलः "....प्रत्येक गोष्ट तुमच्या ध्येयावर अवलंबून आहे. नुसत्या प्राणमय व पार्थिव उपभोगाचं सामान्य जीवन जगणं हे ध्येय असेल, तर तुम्हाला आपली सहचारिणी कुठूनही निवडता येईल. कला, संगीत अथवा स्वदेशाची सेवा यांसारखे ते ध्येय अधिक उदात्त असेल, तर जीवनसखीची निवड वासनेच्या नव्हे तर काही उच्चतर तत्त्वानुसार ठरवायला हवी आणि तुमच्या प्रकृतीतील मानसिक अंशांशी सुसंवादी असं काही तरी त्या

स्त्रीजवळ असायला हवं. आध्यात्मिक जीवन हे तुमचं ध्येय असेल, तर विवाह करण्यापूर्वी तुम्ही पन्नास वेळा विचार करायला हवा...ही विचार सामग्री स्वतःसमोर ठेऊन तुम्ही स्वतःच स्वतःपुरता निर्णय घ्यायला हवा."

शिष्य जितकी अधिकाधिक साधना करीत, तितकी तितकी त्यांना स्वतःच्या स्वभावातील असंस्कृत घटकांची अधिकाधिक जाणीव होई. ते निरनिराळ्या देशांतले, विभिन्न धर्मांचे असत आणि साहजिकच ते स्वतःचा सहजसिद्ध स्वभाव घेऊनच येत. प्रत्येकाच्या स्वतःच्या क्षमताही असत आणि अडचणीही, तसेच प्रत्येकाची मीमांसा व्यक्तिशः स्वतंत्रपणे करावी लागे. एका शिष्याने वासना जिंकण्याकरिता उपास करण्याचा प्रयत्न केला, पण त्याला यश आले नाही. हा प्रश्न निर्णयार्थ श्री अरविंदांकडे पाठविला. उत्तर लगेच आले, "खऱ्या जीवात्म्याच्या दृष्टीने साऱ्याच सर्वसामान्य प्राणमय हालचाली परक्या असून त्या बाहेरून येत असतात. त्या आत्म्याच्या स्वतःच्या नसतात किंवा त्यांचा उगमही आत्म्यातून होत नसतो, पण त्या सर्वसाधारण निसर्गाच्या, प्रकृतीच्या लहरी असतात."

"वासना बाहेरून येतात व अवचेतनात प्रवेश करून पृष्ठभागी चढतात. त्या पृष्ठभागावर चढतात आणि मनाला त्यांची जाणीव होते तेव्हाच कुठे आपल्याला त्या जाणवू लागतात. ती वासना आपली स्वतःची असल्यासारखी आपल्यासारखी आपल्याला भासते', ती अशा प्रकारे प्राणमयातून मनात चढताना ती आपल्याला जाणवते आणि ती बाहेरून आल्याचं आपल्याला माहीतच नसतं म्हणून. प्राणमयाची, जीवात्म्याची स्वतःची असते ती स्वतः वासना नव्हे, तर सर्वसाधारण प्रकृतीतून तिच्यात प्रविष्ट होणाऱ्या सूचनांच्या प्रवाहांना किंवा लहरींना प्रतिसाद देण्याची सवय."

एका शिष्याने त्यांना विचारले, "वाचनाविषयी आपण 'क्ष' ना काय लिहिलंत हे मी पाहिलं. मला हे जाणण्याचे कुतूहल आहे की, ते मलाही लागू पडतं का?" श्री अरविंदांनी उत्तर दिलं, 'क्ष' साठी जे लिहिलं ते तुझ्या उपयोगाचं नाही. ते संवित्तीच्या अशा व्यापारापर्यन्त पोहोचले आहेत की त्यांना वाचनाची यापुढे मुळीच आवश्यकता नाही, उलट ते कदाचित त्यांच्या संवित्तीत घोटाळेच करील. तुमच्या वाचनावर मात्र कसलाच आक्षेप नाही, मात्र ते तुमच्या ध्यानाच्या आड येऊ नये म्हणजे झालं."

त्याचा शिष्याने त्यांना फिरून लिहिले, 'बंगालीत कविता, कथा आणि सर्वच प्रकारचं साहित्य लिहिण्याची मला जशी काही ओढ लागली आहे!' त्याला श्री अरविंदांनी उत्तर दिले, "तसल्या प्रकारची महत्त्वाकांक्षा इतकी अस्पष्ट असते की ती सफल होत नाही. यश मिळविण्याच्या दृष्टीने तुम्ही आपलं क्षेत्र सीमित करून घ्यायला हवं आणि एकाग्र व्हायला हवं. शास्त्रज्ञ, चित्रकार किंवा सेनानी बनण्याचा कोणताही प्रयत्न मी करीत नाही. मला विवक्षित गोष्टी पार पाडावयाच्या आहेत आणि ईश्वराची तशी इच्छा होती तोवर त्या मी केल्यादेखील आहेत. ईश्वराला जेवढं हवं होतं तितकं मी त्यातून पार पाडलं आहे. 'क्ष' ला

गतिशीलता लाभलेली होती आणि ती होती तोवर किंवा ती असे तितक्यांदा तो तिचं अनुसरण करीत असे. तुम्ही कर कर विचार करता, कर कर चर्चा करता, सारखं पुढेमागे करता...आध्यात्मिकता आणि सर्जनशील कार्य यांत कसलाही विसंवाद नाही. ते एकत्र नोंदवता येतात. मार्गाची धरसोड कार्याच्या आणि म्हणूनच यशाच्याही आड येत असते. माणमाला एक किंवा दुसरं करता येईल, किंवा एखाद्याला दोन्हीही करता येतील, पण निरंतर धरसोड मात्र करून चालणार नाही.

कित्येक वेळा रोगांसंबंधीचेही प्रश्न असत. एका शिष्याने विचारले, "पण रोगांचं काय? योगाला ते सारेच बरे करता येतात का?" श्री अरविंद उतरले, "अर्थात मला करता येतात, पण श्रद्धा व ग्रहणशीलता किंवा दोन्ही असाव्या या अटीवर. नुसत्या मनःसूचनेनेदेखील कर्करोग (कॅन्सर) बरा होऊ शकतो-अर्थात दैव अनुकूल असेल तरच. एका स्त्रीच्या उदाहरणाने सिद्ध झालेलं आहे. तिच्या कर्करोगावर (कॅन्सरची) सारी लक्षणे नाहीशी झाली आणि ती कित्येक वर्षांनंतर अगदी निराळ्याच रोगाने मरण पावली." स्वतः डॉक्टर असलेल्या या शिष्याने श्री अरविंदांच्या शक्तीची एका रोग्यावर चाललेली प्रक्रिया प्रत्यक्षच पाहिली होती आणि त्याने लिहिलं होतं, "तुम्ही आमची पत्रे वाचली की तत्काळ आम्हाला हवं असलेलं सहाय्य मिळतं असा आम्हा सर्वांचा विश्वास आहे." श्री अरविंदांनी उलट लिहिले, "आंतर जीवात्मा कितपत जागरूक आहे यावरच ते अवलंबून असतं-एरवी माणसाला पार्थिव आलंबनाची निवड भासते. काही लोक तसे आहेत की त्यांना आम्ही पत्र वाचल्यानंतर उतार पडतो. काहींना तो त्यांनी लिहिताक्षणीच पडतो किंवा ते पत्र आम्हाला पोचण्यापूर्वी किंवा पोचल्यानंतर, पण आम्ही ते वाचण्यापूर्वीच पडतो. इतरांना मात्र विवक्षित गोष्ट केवळ मनानेच आमच्यावर सोपविल्यानेच उपशम लाभतो."

त्याच डॉक्टरांनी फिरून विचारले, "माणसाचे आजार त्याच्या देहात प्रविष्ट होण्यापूर्वीच ते जाणता येतील असं आपण म्हटलं आहे; तसं असेल तर माणसाला नेहमीच त्यांना प्रतिबंध करून संपूर्ण प्रतिरोधशक्ती लाभू शकेल का? श्री अरविंदांनी लिहिले, "पार्थिव देहात शिरण्यापूर्वी सारेच रोग सूक्ष्म संवित्तीच्या व सूक्ष्म देहाच्या ज्ञानतंतुमय आणि प्राणमय कायिक कोशातून संक्रांत होत असतात. एखाद्याला सूक्ष्म देहाची अथवा सूक्ष्म संवितीची जाण असेल, तर तो रोगांना मार्गातच अडवून शरीरात प्रविष्ट होण्यास प्रतिबंध करू शकेल. पण आजार माणसाच्या लक्षात आल्यावाचून, किंवा अवचेतनाच्या मार्गाने माणूस झोपलेला असताना, किंवा बेसावध असताना आकस्मिकपणे झटक्याने येण्याचा संभव असतो. मग त्याने शरीरात जिथे पाय रोवला असेल तिथून त्याला हुसकून देण्यासाठी झगडण्याव्यतिरिक्त दुसरे काहीच करण्यासारखे नसते. या आंतरिक उपायांनी साध्य होणारं आत्मसंरक्षण कधी कधी इतकं बलवत्तर बनू शकतं की शरीर जवळ जवळ रोगप्रतिकारकच बनून जातं, आणि पुष्कळसे योगी तसे असतातही. परंतु या 'जवळ जवळ' चा अर्थ संपूर्णतया असा मात्र नाही. संपूर्ण प्रतिकारक्षमता उन्मनी

परितर्वनानंतरच येऊ शकते. कारण उन्मनीच्या खालच्या अवस्थेतील प्रतिकारक्षमता हा अनेक शक्तीतल्या एकीच्या व्यापाराचा परिणाम असून, साधलेल्या समतोलाला धक्का लागल्यास तीही विचलित होण्याची शक्यता असते. उन्मनीत मात्र तो सृष्टीचा नित्यनेम बनलेला असतो, उन्मनीभूत देहात रोगप्रतिकारक्षमता त्यांच्या नव्या प्रकृतीत सहजसिद्ध व स्वभावतःच अंतर्निहित झालेली असते."

श्री अरविंदांना कळवलं गेलं की "लोक पूर्वीपेक्षा डॉक्टर व औषधे यांवर आता अधिक अवलंबून राहू लागले आहेत असे दिसते." त्यांचे उत्तर "पूर्वीच्या लहानशा समाजात नसलेल्या सर्व प्रकारच्या गोष्टींचा प्रभाव लोकसंख्येत वाढ झाल्याने पडू लागला आहे. जोवर श्रद्धा हाच प्रमुख घटक असून थोडेसेच उपचार उपकारक ठरत असत, तोवर डॉक्टरांना महत्त्व नव्हतं. पण श्रद्धा नाहीशी होताच रोग वाढले आणि डॉक्टर केवळ उपयुक्तच नव्हे, तर अपरिहार्य होऊन बसले. एक तिसरंही कारण होतं. संशय, तमोमालिन्य व प्रतिकार या साऱ्यांनी बुजबुजलेल्या शारीरिक संवित्तीत साधनाचं अवतरण. या साऱ्यांची वजावट करणं यापुढे शक्य नाही."

शिष्यांनी स्वतः केलेले आत्मनिरीक्षण आपल्या समोर ठेवावे यासाठी श्री अरविंद उत्तेजन देत. त्यांनी लिहिलं आहे, "तुम्ही जागरूक असणं आणि आपलं आत्मनिरीक्षण आमच्यापुढे ठेवणं अगत्याचं आहे. त्याच्याच आधारे आम्ही प्रत्युपाय करीत असतो. आपल्या अडचणींचे यथातथ्य निवेदन आम्हापुढे करणे हाच पुष्कळांच्या संदर्भात सर्वोत्कृष्ट आणि नेहमीच नसला, तरी कित्येकदा तत्क्षणीच सोडवणूक करणारा उपाय ठरतो ही, शतावधी उदाहरणांनी सिद्ध करून दिलेली वस्तुस्थिती आहे."

स्वतःच्या मुक्तीसाठी पाठविलेल्या शक्तीची प्रक्रिया एका शिष्याला असह्य झाली आणि गुरूंना त्याचं सांत्वन करावं लागलं. "तुम्हाला इतकं भोगावं लागलं याचं आम्हाला वाईट वाटतं. माताजींनी प्रेरणेचा दाब घातला तो तुम्हाला दुखवण्यासाठी नव्हे, तर मुक्त करण्यासाठीच."

दुसऱ्या एकाला पुढीलप्रमाणे उत्तेजन लाभले. "तुम्हाला दिसणाऱ्या वस्तू ही म्हणजे संवित्तीवर कोणताही परिणाम न घडविणारे नुसते आभासच असण्याचं भय मुळीच नाही. तुमची संवित्ती आधीच पुष्कळशी पालटली आहे आणि तरीदेखील पुढे घडून यायच्या अधिक मोठ्या परिर्वतनाचा हा नुसता प्रारंभच झालेला आहे."

श्री अरविंदांनी स्वतःच्या मार्गदर्शनाचे विवरण केलेः "एखाद्याने तशी संधी उपलब्ध करून दिल्याविना मी त्याला त्याचे दोष कधीच दाखवीत नसतो. साधकाला स्वतःलाच जाणीव व्हायला हवी आणि त्याने ईश्वरी दीप्तीसमोर आत्मसमर्पण करायला हवे व (स्वतःचे दोष) पाहायला, टाकायला आणि पालटायला हवेत. हस्तक्षेप करणे, व्याख्याने झोडणे आणि हे किंवा ते दाखवून देत रहाणे ही आमच्या दृष्टीने उचित पद्धती नव्हे. ती तर पंतोजीची री असते. आध्यात्मिक परिवर्तनाच्या क्षेत्रात ती कामी पडत नाही."

ब्रह्मचर्य हे श्री अरविंदांच्या योगातील प्रमुख अंगापैकी एक अंग होते. कामोपभोग केंद्राच्या परिवर्तनाविषयीच्या त्यांच्या पत्रातले काही उतारे येथे दिले आहेत. “पार्थिव सिद्धीसाठी कामकेंद्राचं परिवर्तन आवश्यक ठरतं. कारण प्रकृतीच्या साऱ्या मानसिक, प्राणमय व शारीरिक शक्तींचा शरीरातील मूलाधार तोच असतो. त्याचे रूपांतर उन्मनीज्योती, सर्जनशक्ती व विशुद्ध ईश्वरी आनंद यांच्या पिंडीभूत स्वरूपात व क्रिया व्यापारांत करावे लागते. उन्मनीज्योती, शक्ती आणि आनंदानुभूती त्या केंद्रात उतरवल्यानेच केवळ त्यात पालट घडवून आणता येतो. त्यांच्या पुढील कार्याविषयी म्हणाल तर, उन्मनी सत्य, सर्जनशील दृष्टी व दैवी मातेची इच्छाशक्ती याच ते निश्चित करीत असतात. पण आता ते कार्य संवित्तीयुक्त सत्याचे असेल, कामवासना आणि उपभोग धारण करणाऱ्या तमाचे आणि अंधाराचे नव्हे. आता ती जीवनाशक्तीचे संरक्षण आणि निरिच्छ व मुक्त वितरण करणारी शक्ती असेल, त्यांना बाहेर घालवून वाया दवडणारी नव्हे. उन्मनी जीवन म्हणजे केवळ प्राणमय व पार्थिव देहाच्या वासनांचे उच्चतर समाधान ही कल्पना टाळा. मानवी स्वभावातल्या या पशुवृत्तीचे उदात्तीकरण होण्याच्या या आशेपेक्षा दुसरा कोणताही अधिक मोठा अडथळा उन्मनी सत्याच्या अवतरणाच्या मार्गात असू शकत नाही. उन्मनी अवस्था आपल्या स्वतःच्या आवडत्या कल्पनांना आणि पूर्व ग्रहांना पुष्टी देणारी ठरावी असे मनाला वाटत असते. पार्थिव देहाची इच्छा तिच्यायोगे आपल्या स्वतःच्या सुखसोयी, विषयोपभोग आणि सवयी संपन्न व दीर्घकालीन व्हाव्यात अशी असते. ती तशी होईल तर, ती म्हणजे पशुवृत्ती आणि मानवी स्वभाव यांचा नुसता अतिरेकी आणि मर्यादेबाहेर वाढलेला परमोत्कर्ष ठरेल, पण मानवी प्रकृतीतून ईश्वरी स्वरूपात झालेले संक्रमण ठरणार नाही.

प्राणायाम व योगासनासारखे इतर शारीरिक व्यायाम कामवासनेचे उच्चाटन निश्चित करतातच असे नाही. कधी कधी शरीरातल्या प्राणशक्ती अतोनात वृद्धिंगत करून त्या कामवासनेचेदेखील बळ विस्मयजनक प्रमाणात वाढवू शकतात, कारण ती वासना शारीरिक जीवनाचा मूलाधार असल्याकारणाने नेहमीच दुर्जय असते. या व्यापारां पासून स्वतःला अलग करून, आपल्या अंतरात्म्याचा शोध घेणे आणि त्यातच जीव व्यतीत करणे, एवढी एकच गोष्ट आपण करण्याजोगी असते. मग त्यापुढे ते व्यापार आपले स्वतःचे असल्यासारखे भासणार नाहीत तर अंतरात्म्यावर किंवा पुरुषावर बाह्य प्रकृतीने लादलेले वरवरचेच व्यापार असल्याचे ध्यानात येईल. मग त्यांचा त्याग अधिक सुलभतेने करता येईल किंवा त्यांना कःपदार्थ करून टाकता येईल.”

निद्रा आणि स्वप्ने यांचाही त्यांच्या उज्ज्वल मार्गदर्शनाच्या विषयांत समावेश असे. विवरण कसे करावयाचे हे जर शिकून घेतले, तर स्वप्नांचे मधून आपल्या स्वतःच्या आणि इतरांच्याही स्वभावातल्या रहस्यांचे पुष्कळसे ज्ञान माणसाला मिळवता येईल” असे त्यांनी लिहून ठेवले आहे.

"दर्शनासमयी गुरू संसंचन कसे करतात?" याचे विवरण करताना श्री अरविंद माताजींविषयी म्हणाले, "माताजी दोन्ही मार्गांनी सूचना देत असतात. नेत्राद्वारा मानसिक, तर स्पर्शद्वारा शारीरिक अंशाला ती लाभते." प्रणाम करण्यासाठी शिष्य माताजीकडे येत, तेव्हा त्या त्यांना फुले देत असत (फुलांच्या जवळ जवळ चारशे भिन्न प्रकारांना त्यांनी विशिष्ट आध्यात्मिक आशय दिला होता). माताजींच्या पुष्पदानाचा अर्थ श्री अरविंदांनी विशद केला होता. "ते फूल जिचे प्रतीक असते त्या गोष्टीचा साक्षात्कार होण्यास ते उपकारक ठरावे असा त्याचा हेतू असतो."

स्वतःचे शिष्यांची नाते काय याविषयी बोलताना माताजींनी म्हटले आहेः "तुमच्या माझ्यात-श्री अरविंदांच्या आणि माझ्या उपदेशाकडे जे कोणी वळले त्या साऱ्यांतच-एक विशेष व्यक्तिगत भावबंध असतो; इथे अंतराला महत्त्व नसते हेही नीटपणे ध्यानी घेतलेलं असतं. तम्ही फ्रान्समध्ये असा नाही तर जगाच्या दुसऱ्या टोकाला असा किंवा पाँडिचरीतच असा, हा बंध नेहमीच सत्य व जिव्हाळ्याचा असतो. ज्यांना मी शिष्य म्हणून स्वीकारले आहे, त्यांच्या संदर्भात तर भावबंधाहूनही अधिक काही तरी असते, (माझ्यापासून फाकणारी शक्ती त्यांना लाभत असते) वस्तुतः मी साऱ्यांचेच-अगदी ज्यांना मी आयुष्यात केवळ एकदाच क्षणीच भेटले असेन त्यांचेदेखील-दायित्व स्वतःवरच घेते."

आणि दुसऱ्या एका संदर्भात (त्या म्हणाल्या), "प्रभुत्व म्हणजे विवक्षित स्पंदनांचे नियमन कसे करावयाचे हे माहीत होणे. कशावर तरी, उदाहरणार्थ एखाद्या व्यापारावर प्रभुत्व मिळवायचे म्हणजे कोणत्याही शब्दावाचून, कसल्याही स्पष्टीकरणाविना केवळ स्वतःच्या उपस्थितीनेच अनिष्ट स्पंदनाच्या ठिकाणी योग्य स्पंदनाची स्थापना करावयाची शब्दांच्या सहाय्याने, विवरणाच्या किंवा चर्चेच्या सहाय्याने, किंवा विवक्षित शक्ती प्रयुक्त करूनदेखील, तुम्ही दुसऱ्यावर प्रभाव गाजवू शकता, पण एखाद्या व्यापारावर प्रभुत्व मात्र मिळवत नाही. एखाद्या व्यापारावरील प्रभुत्व म्हणजे त्या व्यापाराच्या स्पंदनाविरुद्ध ते थांबबू शकणारे अधिक प्रबळ आणि अधिक यथातथ्य असे स्पंदन योजण्याची क्षमता होय."

"विवक्षित गोष्ट स्पष्ट करण्यासाठी शब्दांची निकड भासेल, तर तुम्हाला खरे ज्ञान लाभलेच नाही. तुम्हाला उमज पाडण्यासाठी मला जे काही कळवायचे असेल ते सारेच मला बोलून दाखवावे लागले, तर मला प्रभुत्व लाभलेले नाही; मी केवळ तुमच्या बुद्धीद्वारा प्रभाव पाडते, तुम्हाला जाणून घेण्यास सहाय्य करते, तुमच्या ठायी जाणण्याची, स्वतःचे नियमन करण्याची, इत्यादी इच्छा जागवते एवढेच. पण नुसते तुमच्याकडे पाहून काहीही न बोलता, तुम्हाला जाणायला लावील अशा ज्ञानदीप्तीत प्रवेश करण्यास तुम्हाला भाग पाडायला मी समर्थ नसेन, तर, त्याचा अर्थ असा की, मी अज्ञानाच्या अवस्थवेर जय मिळविलेलाच नाही.

15

# श्री अरविंदाचे लेखन

श्री अरविंदांच्या लेखनातले साधारण घटक या नात्याने तीन विशेष ठळकपणे डोळ्यांत भरतात. इंग्रजी भाषेवरील त्यांचे गाढे प्रभुत्व; 1908 नंतर निगूढ मनातून लाभलेली स्फूर्ती; आणि प्रत्येक गोष्टीकडे पाहाण्याचा त्यांचा एकात्म किंवा आध्यात्मिक दृष्टिकोण. त्यांनी परामर्श घेतलेल्या विषयांचा विचार करता, योग्याला कोणताही गोष्ट हाती घेता येते हा आपला सिद्धांत त्यांनी सिद्ध केला. त्यांचे लेखन, भग ते राजकीय्र विषयासंबंधी असो वा आध्यात्मिक, पद्यात असो वा गद्यात, सतत स्फूर्तिदायक ठरलेले आहे.

श्री अरविंद म्हणतात, "लेखन करणारा योगी हा काही कोणी साहित्यिक नव्हे, त्याने जे व्यक्त करावे अशी आंतरिक इच्छाशक्तीची किंवा वाणीची अपेक्षा असते तेच केवळ तो लिहीत असतो. हे त्यांच्या सगळ्याच लेखनासंबंधी म्हणता येते. गुरूंनी स्वतःच म्हटले होते त्याप्रमाणे, योगात सर्व गोष्टी शक्य असतात. मी तत्वज्ञ आहे असे मानले जाते, पण मी तत्वज्ञानाचा अभ्यास कधीच केला नाही, मी लिहिलेली प्रत्येक गोष्ट योगजन्य अनुभव, ज्ञान व स्फूर्ती यांमधूनच उद्‌भवलेली आहे. तसेच काव्यावरील माझे महान प्रभुत्व आणि आविष्काराची निर्दोष शैली या गोष्टी शेवटच्या दिवसांत लाभल्या, त्या इतर लोक कसे लिहितात हे वाचून वा पाहून नव्हे, तर माझी संवित्ती उन्नत झाल्यामुळे आणि या उन्नतीतून उदयास आलेल्या महत्तर स्फूर्तीमुळे (प्राप्त झालया).

श्री अरविंदांच्या प्रारंभीच्या लेखनात पुढील लेखांचा समावेश होतोः 1893 साली इंदुप्रकाशमध्ये प्रसिद्ध झालेला "जुने देऊन नवे दिवे" हा निबंध, भवानी-मंदिर योजना, 1906-1908 या अवधीत प्रसिद्ध झालेली 'वंदे मातरम्' मधील शंभरावर संपादकीये, 1909-10 त प्रकाशित झालेले 'धर्म' आणि 'कर्मयोगी' पत्रिकांतले त्यांचे लेख, उत्तरपाडा येथील व इतर ठिकाणची भाषणे आणि पाँडिचरीस आल्यानंतरची त्यांची माँटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांवरील टीका. भारताचे ध्येय या नात्याने संपूर्ण स्वातंत्र्याविषयी आग्रह हे त्यांच्या या साऱ्याच लेखनांचे आणि व्याख्यानाचे वैशिष्ट्य होते. ते म्हणत, "भारत स्वतंत्र झालाच पाहिजे, केवळ स्वतःसाठीच नव्हे, तर उभ्या जगासाठी. त्यांच्या दृष्टीने स्वराज्याचा अर्थ आधुनिक परिस्थितीच्या अनुरोधाने भारताच्या पुरातन जीवनप्रणालीची परिपूर्ती, राष्ट्रीय

गौरवाच्या सत्ययुगाचे पुनरागमन, गुरू व मार्गदर्शक या आपल्या महान भूमिकांचा भारताद्वारा फिरून स्वीकार, राजनीतीत वेदान्ती सिद्धांन्तांची अंतिम परिपूर्ती व्हावी यासाठी लोकांनी घडवून आणलेले आत्मविमोचन, असा होता. भारताच्या दृष्टीने हेंच खरेखुरे स्वराज्य होय...स्वतःच्या जीवनाच्या प्रणयनाचे अधिकार स्वतःच्या हातात आल्याविना भारताला हे जमणार नाही. कोणा परकी साम्राज्याचा प्रदेश किंवा मांडलिक या नात्याने नव्हे, तर एक स्वतंत्र व स्वयंपूर्ण राष्ट्र म्हणून भारताला आपले जीवन व्यतीत करता आले पाहिजे." भारतीय स्वातंत्र्याचा लढा कोणत्या चाकोऱ्यांतून चालवायला हवा याचे दिग्दर्शन त्यांनी कधीच केले होते. एकीकडून निःशस्त्र प्रतिकार, बहिष्कार, असहकार, ग्रामीण पुनर्रचना आणि राष्ट्रीय शिक्षण आणि दुसऱ्या बाजूने, अवश्य तर, सशस्त्र बंडाची सिद्धता (या चाकोऱ्या सुचविल्या होत्या). भारताच्या गौरवशाली भूतकाळाची यथार्थ व सुस्पष्ट कल्पना आणि त्याच्या त्याहूनही अधिक गौरवशाली अशा भवितव्यावरील श्रद्धा यामुळेही हे प्रारंभीचे लेखन वैशिष्ट्यपूर्ण बनले होते.

त्यांनी आपल्या लेखनात व्यक्त केलेल्या कल्पना 1906 त जितक्या यथातथ्य आणि स्फूर्तिप्रद होत्या, तितक्याच त्या आजही आहेत. 28 मार्च 1908 ला त्यांनी लिहिले, "आपण हिंदू आहोत आणि साहजिकच आपली मनोवृत्ती स्वभावतःच आध्यात्मिक आहे, कारण मानवतेसाठी मानववंशाच्या आध्यात्मिकीकरणाचे जे कार्य आपल्याला पार पाडावयाचे आहे ते दुसऱ्या कोणत्याच राष्ट्राला साधण्याजोगे नाही..."24 एप्रिल 1908 च्या त्यांनी लिहिलेल्या 'वंदे मातरम्' मधील एका संपादकीयात त्यांची राजकारणविषयक भूमिका विशद केलेली आहे. भारतीय राजनीतीच्या जुन्या प्रकारापेक्षा नवा प्रकार निराळा असल्याचे दर्शवणाऱ्या दोन गोष्टी आहेत, पहिली, त्यातील उत्कट राष्ट्रवाद आणि दुसरी, त्याची तीव्र आध्यात्मिकता."

आध्यात्मिक तत्वज्ञान, योग, संस्कृती, वेद, भगवद् गीता आणि इतर विषय यांवरील श्री अरविंदांचे प्रमुख ग्रंथ प्रथम 'आर्य' मध्ये क्रमशः प्रकाशित झाले आणि कालांतराने त्यांत सुधारणा करून ते स्वतंत्र खंडांच्या स्वरूपात प्रसिद्ध करण्यात आले. बौद्धिक व वैज्ञानिक विद्याशाखा आणि प्रतिभ अनुभूती यांच्या एकीकरणातून उदय पावलेला आणि एकसमयावच्छेदानेच तर्काधिष्ठित आणि अनुभवातीतही असलेला एक विलक्षण वास्तववाद त्यांच्या लेखनातून फाकलेला दिसतो. हे लेख म्हणजे त्यांचे अध्ययन व ध्यान यांचा परिपाक असून, त्यांत जीवनविषयक उच्चतम समस्यांचे व्यापक चित्र आणि संभाव्य भवितव्याचे पक्के पूर्वानुमान प्रकट झालेले आहे एवढेच नव्हे, तर आध्यात्मिक विकास (एकात्म योग), आध्यात्मिक समाजाची उत्क्रांती आणि अनेकत्वातूनच मानवी एकात्म्याचा साक्षात्कार यासंबंधीही ते प्रत्यक्ष मार्गदर्शन करतात.

वृद्धिंगत होऊन ईश्वरी परिपूर्णता प्राप्त करून घेणे हाच मानवी जीवनाचा खराखुरा धर्म असून माणसाच्या पार्थिव जीवनाला तिच्याच प्रतिमेचा आकार देणे हाच उत्क्रांतीचा

आशय आहे. श्री अरविंदांच्या तत्वज्ञानाचा पायाभूत सिद्धान्त हाच आहे. 'दैवी जीवन' या आपल्या महत्तम कृतीत श्री अरविंदांनी प्रतिपादनाचा आरंभ वेदान्ताच्या भूमिकेवरून, त्यातील आत्मा, मन आणि जीवन, सच्चिदानंद आणि ज्ञानाज्ञानाचे विश्व, पुनर्जन्म आणि ईश्वर यांविषयीच्या त्यातील कल्पनांनी केला आहे. त्यातील आधारभूत सामग्रीतून व्यापक अद्‌वैत प्रस्थापित करण्याचा प्रयत्न त्यांनी केला आहे. मन, जीवन आणि द्रव्य ही विश्वाच्या अस्तित्वाचा खरा मूलाधार असलेल्या आध्यात्मिक मनातून किंवा उन्मनीतून उदयास आलेली आत्म्याचीच साधित रूपे असल्याचे त्यांनी दाखवून दिले आहे. मनाला उन्मनीच्या रूपात विकसित करून मनुष्य या जगातल्या खऱ्या वस्तुस्थितीप्रत आणि खऱ्या धर्माप्रत पोहोचू शकतो. आत्मा हाच सच्चिदानंद असून तो आणि जग यांत अटळ शत्रुत्व मुळीच नाही. आपण जग अज्ञानाच्या डोळ्यांनी पाहतो एवढेच. ते आपण ज्ञानचक्षूंनी पाहायला हवे. आपले अज्ञान हे मुळात भौतिक द्रव्याच्या आभासरूप जाणिवेत गुरफटून गेलेले ज्ञानच असून ते आपल्या जाणीवयुक्त अशा ऐकात्म्याकडे परतण्याच्या मार्गावर आहे. ती परतीची वाटचाल सफल करून मानवी जीवनात आध्यात्मिक जीवनाचा आविष्कार करणे ही पुनर्जन्मांच्या परंपरेने उपलब्ध करून दिलेली संधीच होय. श्री अरविंद उत्क्रांतितत्वाची सत्यता मानतात पण तितकीशी तिला पाश्चात्यानी दिलेल्या भौतिक स्वरूपात नव्हे, तर जीवन, मन व ईश्वर यांची ऐहिक वस्तुतत्वातील अंतर्भूतता आणि त्यांचे क्रमशः आविष्करण या तत्वज्ञानात्मक सत्याच्या स्वरूपात मानतात. आध्यात्मिक जीवन आणि ईश्वरी जीवन या उत्क्रांतीच्या शिखरावर असते.

वेदांवरील आपल्या ग्रंथात श्री अरविंदांनी वेदातील प्रतीकांचे रहस्य प्रकट केले असून, त्यांच्यावर धार्मिक आचारांनी लादलेल्या दुर्बोधतेचे निराकरण केले आहे.

त्यांचा गीतेवरील निबंध महणजे गीतेचे एक उज्जवल विवरण आहे. जीवनसत्याचा सर्वांत मोठा आणि सर्वात कठीण भाग म्हणजे कर्म; त्यालाच आत्मतत्वाच्या क्षेत्रात गीता किती प्रभावीपणे समाविष्ट करते याचे विवरण त्यांनी केले आहे; तसेच गीता म्हणजे आपल्याला कर्माद्वारा आध्यात्मिक जीवनाकडे नेणारा मार्ग या भूमिकेवरून त्यांनी प्रस्तुत ग्रंथात गीतेचा परामर्श घेतला आहे. आंतरिक गोष्टींविषयी अज्ञान, चुकीचे तादात्म्य, मन, जीवन व शरीर यांच्या बाह्य यंत्रणेशी तन्मयता, यांपायी आपला खराखुरा आत्मा व आपली खरी अस्मिता ही आपल्या प्रज्ञेपासून झाकलेली रहातात. पण आपल्या नैसर्गिक साधनांच्या सहाय्याने माणसाचा जागरूक आत्मा या चुकून आलेल्या तद्रूपतेपासून माघारी फिरू शकेल, आणि आपल्या आंतर सत्वाचा त्याला प्रत्यय येऊन तो त्यावरच पूर्ण श्रद्धा ठेवून जीवन व्यतीत करू शकेल, तर सारेच काही पालटून जाईल, मग जीवन व अस्तित्व निराळेच रूप धारण करतील आणि कर्मालाही वेगाचा आशय व आकार प्राप्त होईल. मग त्यापुढे आपले जीवन हे प्रकृतीची क्षुद्र अहंकारी सृष्टी न रहाता, ते एका दिव्य, अमर

आणि आध्यात्मिक अशा शक्तीचे विशाल स्वरूप घेते. आता आपली संवित्तीही या संकुचित व धडपडणाऱ्या मानसिक व प्राणमय जीवाची उरत नाही तर ती अनंत, दिव्य आणि आध्यात्मिक स्वरूपाची बनते. आपली इच्छा आणि कर्मे हीदेखील पुढे या संकुचित व्यक्तित्वाची व अहंभावाची न रहाता, ती एक दिवस आध्यात्मिक कर्म व इच्छा बनतात, मानवी देहाकृतीत मुक्तपणे व्यापार चालविणाऱ्या विश्वात्म्याची, परमात्म्याची आणि चैतनययुक्त ब्रह्माची, इच्छा व कर्मे बनतात.

'योगसमन्वय' या ग्रंथात श्री अरविंदांनी, आध्यात्मिक आत्मनियमाच्या विविध मार्गांतील तत्वे व पद्धती यांचे, तसेच ती मानवी जीवनातील एकात्म दैवी जीवनप्रत कशी नेतात याचेही व्यापक दर्शन घडविण्याचा प्रयत्न केला आहे. 'मानवतेच्या ऐक्याचे ध्येय' या ग्रंथात त्यांनी मनुष्यजातीच्या सध्याच्या प्रवृत्तीचे मूल्यमापन करून, तीत कशाची उणीव आहे हे दाखविण्याचाही प्रयत्न केला आहे; हेतू असा की मानवतेचे खरेखुरे ऐक्य साधता यावे.

मूलतः 'समाजविकासाचे मानसशास्त्र' या नावाने प्रसिद्ध झालेल्या 'मानवी परिवर्तनचक्र' या ग्रंथात त्यांनी भावी समाज आध्यात्मिक कसा बनवता येईल आणि बनेल हेदेखील दाखवून दिले आहे. श्री अरविंदांचे सामाजिक तत्वज्ञान हाही त्यांच्या आध्यात्मिक तत्वज्ञानाचाच एक भाग आहे.

श्री अरविंदांची त्यांच्या शिष्यांना गेलेली पत्रे हा अरविंदांच्या साहित्याचा एक अत्यंत महत्वाचा घटक आहे. त्यांना सहस्रावधी पत्रे येत आणि त्यांचा खूपच मोठा भाग त्यांची उत्तरे लिहिण्यात खर्ची पडे. मानवी जीवनाला स्पर्श करणारा जवळ जवळ प्रत्येकच विषय त्यांत अंतर्भूत झालेला आहे. उदा. ईश्वर, प्रकृती, मानव आणि त्याच्या जीवनाचे स्तर व भाग, ध्यान हठयोग, तंत्रसाहित्य, झोप आणि स्वप्ने, मन, अंतर्ज्ञान, आजार, दृष्टान्त, कला, साहित्य, साधनरूप कर्म, सिद्धिजन्यज्ञान, ब्रह्मचर्य, आहार, देव, कर्म, पुनर्जन्म, वाङ्मयीन टीका, संस्कृती, जागतिक राजकारण, सामाजिक समस्या, काव्यलेखनाच्या कलेतील मार्गदर्शन, पैसा, उन्मनी परिवर्तन, इत्यादी. सारे जीवन हाच योग होय हे त्यांचे तत्वज्ञान आपल्या एकात्म दृष्टिकोनात साऱ्याच क्रिया सामावून घेत असते.

भारतीय संस्कृतीचे मूलाधार या ग्रंथात श्री अरविंदांनी भारताच्या धर्म, कला, वास्तुशिल्प, मूर्तिशिल्प, शिक्षण, राज्यपद्धती इत्यादींमागे असलेले चैतन्यतत्व, म्हणजेच भारताचा आत्मा विचारात घेऊन भारताची संस्कृती हा या आत्म्याचाच आविष्कार असल्याचे दाखवून दिले आहे आणि शेवटी सांगितले आहे, "कोणत्याही बाह्य, संकुचित अर्थाने आपण आपली एकट्याचीच स्वतंत्र अस्मिता बाळगू शकत नाही. कारण आपल्या भोवतालच्या आधुनिक जगाचा विचार आपल्याला अटळपणे करावाच लागतो आणि त्याचे ज्ञानही मुक्तपणे मिळवावे लागते; नाही तर आपल्याला जगताच येत नाही."

संस्कृतीच्या प्रत्येक भागाकडे आपण लक्ष पुरवायला हवे; आणि भारताचा आत्मा

कोणता आहे आणि आदर्श काय आहे हे नेहमी पक्के ध्यानी धरून, या प्रत्येक भागातील प्राप्त परिस्थिती आणि संभाव्य घटना यांच्यावर त्यांचा परिणाम कसा घडवता येईल आणि एका नव्या जयशाली सृष्टीकडे कसे नेता येईल हेही आपण पाहायला हवे.

माताजी, ईश्वराचा समय, पुनर्जन्माचा प्रश्न, इत्यादींसारख्या श्री अरविंदांच्या छोट्या लेखांतही नानाविध समस्यांवर आणि विषयांवर अरविंदीय संवित्तीचा प्रकाशझोत टाकलेला दिसतो. शब्दाच्या सर्वार्थांनी अभिव्यक्तीची निर्दोष परिपूर्णता जाणून घ्यायची असेल, तर आपण ते लेख वाचायला हवेत. ते अंतरातील ज्योत पेटवतात, जणू काय एक नभांगणच उघडून देतात आणि शब्द हाच ज्याचा देह त्या तत्वाचे प्रभावी दर्शन घडवितात.

'भविष्यकाळातील काव्य' या आपल्या पुस्तकात श्री अरविंद विवरण करतात: "सृष्टीमागील ईश्वरीय तत्वाचा आविष्कार करण्याचा प्रयत्न काव्याने, उच्चतम उन्नयनाच्या क्षणी, पूर्वीच्या काळात केलेला आहे; पण भविष्यकाळात अशी अभिव्यक्ती हेच काव्याचे अधिक डोळस ध्येय आणि चिकाटीचे कार्य बनविता येण्याचा थोडा संभव दिसू लागला आहे. मानवाचा गूढतम आत्मा व वस्तुमात्रातील विश्वव्यापी चैतन्य याना शद्बरूप देण्याची समस्या भविष्यकाळातील काव्याने सोडवावयाची आहे. हा साक्षात्कार आणि हा अनुभव यासाठी योग्य ते स्फूर्तिदायक आणि सौंदर्याने युक्त असलेले स्वरूप आणि प्रासादिक, अर्थघन भाषा त्याला शोधून काढावी लागणार आहे.चैतन्य स्थिरीभूत किंवा सुप्रतिष्ठित बाह्य स्वरूप चैतन्याला सुप्रतिष्ठित व अभिव्यक्त करीत नसून, चैतन्यच स्वतःमधून स्वरूपाची व शब्दांची निर्मिती करीत असते, हाच कदाचित भविष्यकालीन काव्यकलेचा अटळ व निर्णायक आशय असेल.

'सावित्री' हे सांकेतिक व पौराणिक आख्यानक काव्य हे श्री अरविंदांचे सर्वात अलीकडचे व प्रदीर्घतम काव्य आहे. त्यातल्या 23,800 निर्यमक काव्यचरणांमुळे ते इंग्लिशमधील सर्वात प्रदीर्घ महाकाव्य ठरते. 'कथावस्तूच्या विचाराची नवी दृष्टी आणि आविष्काराची नवीन पद्धती असलेले नवे आध्यात्मिक काव्य...' असे त्याचे श्री अरविंदांनी वर्णन केले आहे. ते म्हणाले होते, "सावित्रीचा उपयोग मी उन्नयनाचे साधन म्हणून केला. त्याला मी एका विशिष्ट मानसिक स्तरावरून प्रारंभ केला. आणि मी उच्चतर पातळीवर आरूढ होऊ शकलो त्या त्या प्रत्येक वेळी मी ते त्या पातळीवरून फिरून लिहीत गेलो. माझा आणखीही एक कटाक्ष असे. त्यातला एखादा भाग काहीशा खालच्या पातळीवर उगम पावल्यासारखा भासला, तर केवळ काव्य म्हणून तो चांगला होता एवढ्याचसाठी तो तसाच ठेवण्यात मला समाधान नसे. शक्य असेल तोवर सारे काही एकाच टांकसाळीतून बाहेर पडलेले असायला हवे होते. वस्तुतः एक कविता लिहून संपवून टाकायची अशी माझी सावित्रीसंबंधी भूमिका नव्हतीच. आपल्या स्वतःच्या योगजन्य संवित्तीतून काव्य कितपत लिहिता येईल आणि तिला सर्जनशील कसे बनविता

येईल हे अजमावण्याचे माझ्या दृष्टीने, सावित्री हे एक प्रयोगक्षेत्रच होते.'' आणि फिरून (ते म्हणतात), ''सावित्री हा साक्षात्काराचा आणि अनुभूतीचा अभिलेख असून तो सर्वसामान्य प्रकारचा नाहीच.''

खरोखरीच सावित्री हे मानवाच्या सर्व तत्वज्ञानांच्या, सर्व धर्मांच्या अतीत असलेले परमोच्च ईश्वरी ज्ञान आहे. तो अध्यात्ममार्ग आहे, योग आहे. तपस्या, साधन, सारे काही त्या एकातच सामावलेले आहे. त्याच्यात असाधारण सामर्थ्य आहे; जे ग्रहणक्षम असतील त्यांच्यात ते महाकाव्य स्पंदने, संवित्तीच्या सर्वच अवस्थांतली खरीखुली स्पंदने संक्रांत करते; ते म्हणजे सर्वांगपरिपूर्ण समग्र सत्य, श्री अरविंदांनी खाली पृथ्वीवर आणलेले सत्य होय.

श्री अरविंदांनी या महाकाव्यात आपल्याला एक भविष्यसूचक सिद्ध संदेश दिला आहे, तो शोधून मात्र काढता यायला हवा. ते काव्य म्हणजे वस्तुतः एक ईश्वरी संदेशच आहे. ते म्हणजे एक प्रकारचे ध्यान, अनंताचा, शाश्वताचा शोध आहे. योग्य त्या ज्ञानकांक्षेने ते वाचले, तर, त्याचे नुसते वाचनदेखील अमरत्वाचा मार्गदर्शक म्हणून उपयोगी पडेल. इतरही सर्व योगपद्धतींसह योगाची प्रत्येक पायरी त्यात आढळते. असे सांगतात की त्याच्या प्रत्येक पद्यात जे रहस्य प्रकट केलेले आहे त्याचा कोणी मनोभावाने मागोवा घेईल, तर तो निश्चितच उन्मनी परिवर्तनाप्रत पोहोचेल आणि तेही गुरूवाचूनच. ती एक अमोघ मार्गदर्शिका आहे. साक्षात्कारशास्त्र, गूढवाद, तत्वज्ञान, उत्क्रांतीचा इतिहास, मानवजातीचा, देवांचा, सृष्टीचा, प्रकृतीचा इतिहास, विश्वाची निर्मिती कशी झाली, कशासाठी झाली आणि कोणत्या भवितव्यासाठी झाली, हे सारे काही त्यात आहे. त्यात सगळेच आहे; तुमच्या सर्व प्रश्नांची सारी उत्तरे तुम्हाला त्यात आढळतील. त्यात साऱ्यांचे —अजून कोणालाच माहीत नाहीत अशा कितीतरी गोष्टींचे— विवरण केलेले आहे. ते सारे शोधून काढण्याचे सामर्थ्य मात्र तुमच्यापाशी हवे.

सावित्रीतले दोन उतारे पुढे दिले आहेतः

अकस्मात आले हाती जादूचे दातेरी चक्र।
चाळवणारे मायावृत अवर्णनीयाची कालातीत इच्छा
एक प्रार्थना, एक सर्वसाधक क्रिया, एक दयार्द्र कल्पना
शकतात घालू सांगड मानवी शक्तीची, इंद्रियातीत सामर्थ्याशी
चमत्कारच बनतो मग नित्याचा नियम,
एकच समर्थ कृती शकते पालटू घटनाक्रमाची दिशा,
एखादा एकाकी विचार बनतो सर्वशक्तीमान्.
अनंतात जन्म पावलेली परिपूर्णता घालते साद
जवळ यायची काल-जात परिपूर्णतेला

मानवी जीवनाला चकित करणारे ईश्वरी सत्य,
सान्त आकृतींना गाठणारी ईश्वरी प्रतिमा,
आहे एक आगळे जग शाश्वत दीप्तीचे
सामावलेले साम्राज्यात अमर उन्मनीच्या
ठेवते लपवून सत्य आपले मस्तक गूढतेत
मतीला भासते अनाकलनीय त्याचे कोडे,
भौतिक आकृतीच्या पक्क्या शिल्पातले,
अनावृत्त जीवन; उतरला सत्याने तोंडावरचा मुखवटा
प्रकट झाली प्रकृती वस्तूचे सर्वसाधारण धर्म
असतो एक देह चैतन्यतत्वाचाच बनलेला,
आधारवेदी कुंडाची चिरस्थायी अग्नीच्या,
पालटते कृती आत्म्याचे व्यापार,
उचलतो विचार पावले अमोघ आणि ठाम
पूजाविधी जीवन म्हणजे, निरंतर चालणारा
एकमेवाद्वितीयार्थ यज्ञ अत्यानंदाचा.
एक विश्वासार्ह सान्ताठायी वसणारा
अन् तरल ब्रह्मानंदाच्या प्रकाशातून दिसणाऱ्या
लागतो शोध तेजस्वी अमूर्ताच्या मुद्रेचा
क्षणभराच्या सतत्वात, आत्म्यातच त्या क्षणाच्या
मधु-मद्याचे शाश्वताच्या येतात घेता घोट.

इंग्लंडमध्ये असताना, वयाच्या अठराव्या वर्षी लिहिलेली 'मर्टिलेप्रत गीते,' श्री अरविंदांच्या प्रारंभीच्या कवितात मोडतात. ही 1890-92 या काळात लिहिली गेली. त्यांच्या प्रारंभीच्या 24 कवितांतल्या बहुतेक सगळ्या, त्यांच्या 'कविता व नाटके' या संग्रहात प्रसिद्ध झालेल्या असून त्या 1905 ते 1910 या अवधीत, त्यातल्या काही पाँडिचरीतच, लिहिल्या होत्या. 'इलियन' हे मात्रात्मक षट्पदीत रचलेले महाकाव्य ग्रीक आतंकवादी (रुद्र) अकिलीस, आणि ॲमेझोन लोकांची राणी, पेंथसिलिया, यांच्यामधील लढायांवर लिहिलेले आहे.

संस्कृत व बंगाली या भाषांत लिहिलेली अनेक काव्ये आणि नाटकेही अरविंदांनी इंग्रजीत भाषांतरित केली. कालिदासाचे 'विक्रमोर्वशीय' (नायक आणि अप्सरा) नाटक आणि वेदांतल्या आध्यात्मिक अग्नीविषयक ऋचा ही संस्कृतमधून केलेल्या भाषांतरांत उल्लेखनीय आहेत.

श्री अरविंदांनी लिहिलेल्या नाटकांचाही विसर पडता कामा नये. निर्यमक पद्यात रचलेल्या त्यातल्या चार नाटकांची घटनास्थळे —प्राचीन ग्रीस, सीरिया, पर्शिया (इराण)

आणि इराक या विभिन्न देशांतली आहेत. 'वासवदत्ता' हे नाटक, त्याच्या नावाने सूचित केल्याप्रमाणे प्राचीन भारतीय वातावरणातले आणि महाभारतातील युद्धाच्या काळानंतरचे आहे. ही सारीच नाटके घटनांचे नियमन करणाऱ्या ईश्वरी संवित्तीकडे अंगुलिनिर्देश करतात आणि अमरत्व व सुसंवाद यांकडे झुकलेल्या एक मूक प्रेरणेचा आविष्कार करतात.

साहित्य समालोचकाच्या भूमिकेवरून श्री अरविंदांनी गटे, शेक्सपिअर, होमर, वर्डसवर्थ, वाल्मीकी, दान्ते, कालिदास, एस्किलिस, वर्जिल, मिल्टन, सॉफॉक्लिस, व्यास, आणि इतरही कित्येक, अशा नानाविध साहित्यिकांवर स्वमतप्रदर्शक टीकालेख लिहिलेले आहेत.

भूत, वर्तमान आणि भविष्य, तसेच ईश्वर व सृष्टी, सारे काही श्री अरविंदांच्या लेखांतून एकात्म संवित्तीच्या अनुभूतीच्या व अभिव्यक्तीच्या रूपाने एकरूप होऊन जातात. ते म्हणजे ईश्वराकडून मानवतेला लाभलेले वरदानच होत.

16

# श्री अरविंदाश्रम

एकदा माताजी म्हणाल्या, "प्रत्येकाला स्वतःच्या शक्तींचा संपूर्ण विकास साधून त्या जिथे अभिव्यक्त करता येतील असे एक मोठे कुटुंबच संघटित करणे हे माझे उद्दिष्ट आहे."

हा आश्रम म्हणजे श्री अरविंद आणि माताजी यांच्या ध्येयांचे स्वाभाविक व वर्धिष्णू असे व्यक्त रूप होय. 1910 त श्री अरविंद प्रथमच पाँडिचरीस आले, तेव्हा त्यांच्या सोबत त्यांचे काही तरुण राजकीय सहकारीदेखील आले होते; आणि ते एक कुटुंब म्हणून एकत्रच राहू लागले. वर्षे उलटत गेली, तसे इतर आध्यात्मिक साधकही त्यांना येऊन मिळू लागले. परंतु 1920 मध्ये माताजींचे अखेरीस आगमन होईपर्यंत लोक मोठ्या संख्येत येऊ लागले नव्हते आणि समाईक जीवनास आरंभही करता आला नव्हता. हे लक्षात ठेवायला हवे की प्रत्यक्ष आश्रम आकारास आला तो 24 नोव्हेंबर 1924 नंतर श्री अरविंदांनी शिष्यांना माताजींच्या हाती निरविले तेव्हापासूनच.

भारतातला 'आश्रम' हा सामान्यतः एक आध्यात्मिक किंवा धार्मिक परिवार असतो आणि त्याचे सदस्य हे स्वतःला आध्यात्मिक जीवनास वाहून घेण्याच्या उद्देशाने गुरूभोवती जमा झालेले असतात. शिष्य प्रथम श्री अरविंदांभोवती आणि पुढे माताजींच्याभोवती जमा झाले होते, एवढी वस्तुस्थिती वगळता, वरील व्याख्या श्री अरविंदाश्रमाला लागू पडत नाही. श्री अरविंद म्हणत, "हा आश्रम निर्माण केला आहे तो जगाचा परित्याग करण्यासाठी नव्हे, तर जीवनाचा एक आगळाच प्रकार आणि आकार उत्क्रांत करण्यासाठी अभ्यास करण्याचे केंद्र व क्षेत्र या नात्याने तो स्थापन झालेला आहे."

आश्रम स्थापण्याचा विचार कधीकाळी मनात आणण्यापूर्वीच, बंगालमध्ये त्यांना अटक झाली त्याच्याही आधी, श्री अरविंदांनी ठामपणे सांगितले होते, "आध्यात्मिक जीवनाची सर्वांत अधिक आशयगर्भ अशी अभिव्यक्ती, योगाच्या बळावर आपले सर्वसाधारण मानवी जीवन कंठणाऱ्या व्यक्तीच्याच ठायी होत असते. मानवजात परिणामी उन्नत होऊन बलशाली आणि दिव्य बनणार आहे ती बाह्य व आंतर जीवनाच्या अशा संगमामुळेच."

अर्थात आश्रम हे एक असे ठिकाण आहे की जेथे सर्वसाधारण दैनंदिन जीवन हा

आध्यात्मिक जीवनाचाच एकात्म घटक होतो. सर्व राष्ट्रांतले आणि जीवनाच्याही सर्व श्रेणीतले, आश्रमातील 1600 सदस्य, हे संन्यासी वा यती नसून साधक, अन्वेषक आणि उन्नती अपेक्षिणारे असे आहेत; त्यांचे ध्येय इथे पृथ्वीवर आणि पार्थिव जीवनातच दिव्य जीवनाप्रत पोहोचणे हे आहे. माताजींच्या पारखीनुसार ज्यांना दिव्यत्वाची हाक पोहोचली असेल त्यांनाच केवळ आश्रमात प्रवेश दिला जातो. श्री अरविंदांनी एकदा स्पष्टीकरण केले, "धनिक व अकिंचन, आणि मानवी निकषानुसार जे उच्चवर्णीय वा निम्नवर्णीय ठरतात, त्या साऱ्यांचे आम्ही सारखेच स्वागत करतो आणि त्यांना समान प्रेम व संरक्षणही देतो."

1920 पासून आश्रम सतत वृद्धिंगतच होत गेलेला आहे. ज्यात माताजी राहतात आणि जिथे श्री अरविंदांची समाधीही आहे त्या मुख्य बंगल्याच्या जोडीलाच, साऱ्या पाँडिचरी नगरभर आणि त्याच्या सीमेवरही आश्रमाची स्वतःची घरे आहेत. 'आश्रमाचा परिसर कोणता?' या प्रश्नाचे उत्तर देताना श्री अरविंदांनी म्हटले होते, "आश्रमाचे साधक ज्यात राहतात ते प्रत्येक घर आश्रमाच्या परिसरात मोडते."

आश्रमात प्रथमच आल्यावर काहींची, विशेषतः पाश्चात्यांची, निराशाच होते. त्यांना काही तरी शिकायला कोणीदेखील सहाय्य करीत नाही. कसले वर्ग नसतात, व्याख्याने, शिकवणे काहीच नसते. श्री अरविंद आणि माताजी यांची वचने तेवढीच असतात आणि ती मात्र साऱ्यांनाच उपलब्ध असतात. तिथल्या पराकाष्ठेच्या कार्यव्याप्त जीवनात शिष्य होऊ पहाणाऱ्याला प्रत्येक गोष्ट स्वतःच शोधून काढावी लागते. त्याला त्याच्या स्वतःवरच सोपवून दिलेले असते. आंतरज्योतीव्यतिरिक्त तिथे कोणत्याही संरक्षक भिंती नाहीत.

मानसिक, प्राणमय व मनोमय अशा उत्क्रांतीच्या साऱ्याच स्तरांना सामावून घेणारी एक विशाल प्रयोगशाळा या शब्दांत आश्रमाचे वर्णन केले जाते —श्री अरविंदांनीच त्याचे असे वर्णन केलेले आहे. मानवतेच्या सर्व प्रकारांना आणि सर्व परंपरांनाही तेथे प्रतिनिधित्व (स्थान) लाभलेले आहे. काही साधक हिंदू धर्मात लहानाचे मोठे झालेले आहेत,तर इतर साधक इस्लामी, ख्रिस्ती, ताओ, बौद्ध, इत्यादी प्रणालींनुसार वाढलेले आहेत. आणि सारीच उत्क्रांतीच्या निरनिराळ्या अवस्थांप्रत पोहोचलेले आहेत. प्रत्येकाला आपल्या स्वतःपुरते सत्य स्वतःच शोधून काढावे लागते आणि ते व त्याच्या शेजारच्या व्यक्तीचे सत्य ही एकच असतील असेही नाही. श्री अरविंदांनी काय सांगितले आहे याला न जुमानता काही जण संन्यस्तवृत्तीविषयी श्रद्धा बाळगून विविक्तवासही पत्करतात.

बहुतेक साधक काम करीत असतात आणि प्रत्येकाच्या अभिरुचीला मानवण्याजोगे काम तिथे असते ही. बालोद्यानापासून ते थेट विश्वविद्यालयीन पातळीपर्यन्त शिक्षण देणाऱ्या आंतरराष्ट्रीय शिक्षणकेंद्रात तुम्ही हवे तर शिक्षक बनू शकता. किंवा स्टेनलेस स्टील (निष्कलंक पोलाद), हाताने बनविलेला कागद, फर्निचर (गृहसज्जा), सुगंधी द्रव्ये, हातमागावरील कापड यांच्या उत्पादनाला किंवा एखाद्या शेतात वा मळ्यात तुम्ही

हातभार लावू शकता. तुमचा यंत्रशास्त्राकडे कल असेल, तर मोटरगाड्या, यांत्रिक नांगर आणि मालमोटारी इत्यादींचे कारखानेही आहेत. नाही तर शिंपीकाम, भट्टीवर भाकऱ्या (रोट्या) भाजणे, (अनेक भाषांतून होणारे) मुद्रणकार्य, सुतारकाम, किंवा दुग्धशाळेतील काम यांतही तुम्ही आपल्या हाताची कुशलता पारखू शकता. अथवा तुम्हाला खरीखुरी सोपी गोष्टच करून पाहायची असेल, तर भोजनगृहातल्या थाळ्या विसळायच्या असतातच.

ग्रंथालये, वाचनालये, एक लांबरुंद क्रीडांगण, एक मोठा पोहण्याचा तलाव, तसेच संगीत, कला व छायाचित्रण इत्यादींसाठीही तेथे सोयी आहे.

कामाचा कोणताही एक प्रकार दुसऱ्याहून श्रेष्ठ मानला जात नाही. कशाचेही पैसे देत नाहीत. साऱ्या जीवनावश्यक वस्तूंचा पुरवठा माताजी करतात आणि अशा रीतीने साधकाला आर्थिक समस्यांतून मोकळे ठेवले जाते. आपल्या जीवनातील सत्य तत्व शोधून काढणे हेच तिथले खरे काम.

एकात्म परिवर्तनाचे ध्येय आपल्या मनात सतत अग्रस्थानी ठेवून सारेच काम सेवावृत्तीने आणि निःस्वार्थीपणाने करायला हवे आणि मग ते ईश्वरार्पण करून टाकायला हवेच. माताजी म्हणतात ईश्वरासाठी काम करणे, म्हणजे आपल्या देहाने प्रार्थना करणेच होय.

आश्रमात जवळ जवळ 800 मुले रहात असतात. श्री अरविंद आंतरराष्ट्रीय शिक्षणकेंद्राची स्थापना 1952 मध्ये झाली आणि त्यात मिळणारे शिक्षण कोणत्याही सर्वसाधारण स्वरूपाचे नसते. माताजी म्हणतात, "शिक्षण परिपूर्ण व्हायचे तर शारीरिक, प्राणमय, मानसिक, आत्मिक आणि आध्यात्मिक या मानव प्राण्याच्या पाच प्रमुख व्यापारांशी निगडित असलेल्या पाच बाजू त्याला असायला हव्यातच." आणि फिरून त्या म्हणतात "शारीरिक, प्राणमय आणि मानसिक, या शिक्षणाच्या तीन सरणी, —ज्यांची व्याख्या 'व्यक्तित्व घडविण्याची साधने' या शब्दांत करता येईल. त्याचा परामर्श घेत असतात. आत्मिक शिक्षणाद्वारा आपण जीवनाचे खरे उद्दिष्ट, आपल्या पृथ्वीवरील अस्तित्वाचे कारण, जीवनाद्वारा ज्याच्याकडे जायचे तो नेमका शोधविषय, आणि त्या शोधाचे प्रतिफलित, तसेच व्यक्तीने स्वतःच्या शाश्वत तत्वासाठी करावयाचे आत्मसमर्पण, या समस्यांवर येतो."

कित्येक वर्षांपूर्वी, माताजी आश्रमातील मुलांची नियमाने भेट घेत असत. त्या काळात त्या मुलांना एकदा माताजींना सांगितले, "तुम्ही माझी सारी बालके येथे एक प्रकारच्या अपवादात्मक स्वतंत्रतेत जीवन व्यतीत करीत असता...एकही सामाजिक बंधन नाही, नैतिक बंधने नाहीत, बौद्धिक बंधने नाहीत-कोणतेही नियम नाहीत. येथे असणाऱ्या एका ईश्वरी दीप्तीव्यतिरिक्त दुसरे काहीही नाही.

त्यांच्या स्वतःच्याच शब्दांत (सांगायचे तर), "एखादे रान फोफावते तसा हा आश्रम

वाढत आणि विकास पावत गेला असून त्यातला प्रत्येक सेवाविभाग निर्माण करण्यात आला तो कोणत्याही कृत्रिम योजनेद्वारा नव्हे, तर काही जिवंत आणि प्रबळ अशा निकडीमुळे केलेला आहे..."

"आश्रम स्थापन झालेला आहे तो त्याने जगाच्या विकासाची आधारभूमी बनावे या हेतूने..."

"या ध्येयासाठी स्वतःचे जीवन समर्पित करण्याचा निर्णय घेणाऱ्या साऱ्याच मंडळींसाठी त्याचे दार मोकळे असून ते नेहमीच मोकळे राहील."

# 17

# ऑरोविल (अरविंदनगरी)

श्री अरविंदांच्या एकात्म योगाचे मुख्य ध्येय उन्मनी परिवर्तन हेच आहे. 29 फेब्रुवारी 1956 ला घडून आलेले उन्मनीचे अवतरण ही त्या परिवर्तनाच्या दिशेची पहिली पायरी होय. (श्री अरविंदांचे नाव दिलेल्या) ऑरोविल (अरविंदनगरी) *या उपनगराची स्थापना ही दुसरी; 1931 सालाइतक्या पूर्वी माताजींनी स्पष्टीकरण केले होते... (उन्मनी आणि पार्थिव जिवात एकदा संबंध प्रस्थापित झाला, की मग, जिचा प्रारंभ एका आदर्श उपनगरापासून होतो आणि अंतिम परिणती सर्वांगपरिपूर्ण अशा जगात घडून येते, अशा नव्या सृष्टीतच त्याचे पर्यवसान व्हायला हवे. श्री अरविंदांच्या आदेशांचे मूर्त प्रतीक बनू इच्छिणाऱ्या ऑरोविलची पायाभरणी 28 फेब्रुवारी 1968 ला करण्यात आली. या मंगल प्रसंगी माताजींनी निवेदन केलेः "सदिच्छा बाळगणाऱ्या जगातील साऱ्या व्यक्तींना ऑरोविलकडून शुभेच्छा. प्रगतीसाठी तहानलेल्या आणि उच्चतर व सत्यतर जीवनाची आकांक्षा बाळगणाऱ्या साऱ्या मंडळींना ऑरोविलला येण्याचे निमंत्रण आहे."

ऑरोविलचा अधिकारलेख पुढील शब्दात लिहिलेला आहेः

"ऑरोविल हे कोणाही विवक्षित व्यक्तीच्या आधीन नसून, ते सामग्र्याने मानवतेसाठीच आहे. पण ऑरोविलमध्ये रहावयाचे, तर माणसाने स्वच्छेनेच ईश्वरी संवित्तीचा सेवक बनले पाहिजे.

ऑरोविल हे कधीच न सरणाऱ्या शिक्षणाचे, अव्याहत प्रगतीचे व कधीही वार्धक्य न पावणाऱ्या तारुण्याचे ठिकाण व्हावयाचे आहे.

भूतकाळ आणि भविष्यकाळ यामधला सेतू बनावे अशी ऑरोविलची आकांक्षा आहे. बाह्य जगातील आणि आंतर मनातील साऱ्याच शोधांचा लाभ घेत घेत, ऑरोविल भावी स्वात्मसिद्धीकडे धैर्याने उड्डाण करील.

समूर्त मानवी ऐक्याचे जिवंत प्रतीक बनण्याच्या दृष्टीने, ऑरोविल हे भौतिक आणि आध्यात्मिक संशोधनाचे क्षेत्र बनून राहील."

माताजींच्या मते, 'जिथे सर्व देशांतल्या स्त्रीपुरुषांना, सारे संप्रदाय, सारे राजकारण

---

***उषानगरी—चैतन्यनगरी**

आणि साऱ्या राष्ट्यत्वभावना यांच्या अतीत होऊन, शांततेने आणि वाढत्या सुसंवादाने जीवन व्यतीत करता येईल असे एक उपनगर ऑरोविलला बनायचे आहे.'

ऑरोविल पाँडिचरीच्या उत्तरेला पाच मैलांवर वसलेले आहे. त्यासाठी निवडलेल्या भूप्रदेशावरून पूर्वेस समुद्र आणि पश्चिमेला व व उत्तरेला अनेक तळी यांचा मनोरम दृश्यपट दृग्गोचर होतो. 50000 लोकांची सोय असलेले उपनगर व्हावे अशी योजना दृष्टीपुढे आहे. ऑरोविल हे नुसते एक सार्वदेशीय सांस्कृतिक उपनगर बनेल एवढेच नव्हे, तर एकात्म जीवनाचा आराखडाही—जीवनाचे सर्वांगीण परिवर्तन आणि पुनर्घटन यांकडे जाणाऱ्या मार्गाचा आराखडाही ते साकार करील. जाणीवपूर्वक उत्क्रांती साधू इच्छिणाऱ्यांना उचित असे ते ठिकाण असेल. आजच्या मानवतेचे साफल्य यातच सामावलेले असून आज त्याच्यापुढे असलेल्या समस्यांची सोडवणूकही त्यातूनच होईल.

श्री अरविंदांच्या आदर्शानुसार जीवन व्यतीत करण्यास सिद्ध असलेल्या जगाच्या सर्व भागांतील लोकांच्या एकत्र मेळाव्याची सोय करणे हे ऑरोविलचे उद्दिष्ट आहे. ते एक असे ठिकाण होईल की जिथे सदिच्छा बाळगणाऱ्या आणि स्वतःच्या ध्येयाविषयी कळकळ असणाऱ्या सर्व मानवी जीवांना जगाचे नागरिक या नात्याने मोकळेपणाने नांदता येईल, जिथे मानवाच्या साऱ्याच लढाऊ प्रवृतींचा उपयोग त्याच्या यातना व दुःखे यांच्या मूळ कारणांवर विजय मिळविण्यासाठी, त्याचे दौर्बल्य व अज्ञान यांवर मात करण्यासाठी, त्याच्या मर्यादा आणि अक्षमता यांना जिंकण्यासाठीच केवळ केला जाईल असे ते शांती, एकमत आणि सुसंवाद नांदणारे ठिकाण असेल. जवळ जवळ संपूर्णतया स्पर्धा आणि संघर्ष यावरच आधारलेले मानवांचे परस्परसंबंध आता अधिक कल्याण साधण्याच्या दृष्टीने सहकार्यभावावर आणि खऱ्याखुऱ्या भ्रातृभावावर उभारले जातील.

निरनिराळी राष्ट्रे आणि भारतातील राज्ये यांचे स्थायी सांस्कृतिक मंडप ऑरोवल नगरीत उभारले जातील आणि त्यांत त्या त्या देशाची संस्कृती, शिल्पकला, भाषा, कला, जीवनपद्धती, आणि नैसर्गिक सौंदर्य यांचे प्रतिनिधिक दर्शन घडेल. इथे मनुष्याला जगातील संस्कृतींचा जिवंत संपर्क घडून तो अनेकतेतील एकत्वाचा आस्वाद घेण्यास शिकू शकेल.

पॅरिसमध्ये भरलेल्या युनेस्कोच्या महापरिषदेने, 1966, 1968 आणि 1970 या तीन वर्षांत तीन ठराव संमत करून ऑरोविल नगरीस सहाय्य देण्याचे एकमताने मान्य केले आहे. मानवाच्या शारीरिक व आध्यात्मिक निकडींशी सुसंगत अशा एकसंध जीवनमानांच्या सुसंवादी वातावरणात निरनिराळ्या संस्कृतींची आणि समाजव्यवस्थांची जीवनमूल्ये संकलित करण्यासाठी आखलेले आंतरराष्ट्रीय सांस्कृतिक उपनगर म्हणून ऑरोविलचा विकास घडवून आणण्यात सहभागी होण्याची विनंती, महासभेने आपल्या 1967 च्या ठरावात सदस्य राष्ट्रांना आणि आंतरराष्ट्रीय स्वरूपाच्या शासकीयेतर संस्थांनाही केली आहे.

ऑरोविलवासीयांना भारताच्या पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी, यांनी पाठविलेला संदेश पुढे दिला आहे:

"पाँडिचरी हे श्री अरविंदांच्या राजकीय निर्वासनाचे आणि आध्यात्मिक उन्मीलनाचे संस्थान होय. त्यांनी दिलेला उज्जवल संदेश जगाच्या निरनिराळ्या देशांत पाँडिचरीतूनच फैलावला. ज्ञानदीप्तीच्या शोधात असलेल्या विभिन्न भूभागांतील साधकांनी तेथेच श्री अरविंदांच्या नावाने एक नवे नगर उभारावे हे उचितच होय. मानवाच्या आध्यात्मिक विकासासाठी अवश्य असलेल्या परिसरात्मक अंगाचे ज्ञान होण्याच्या दृष्टीने हा प्रकल्प उत्साहप्रद आहे. ऑरोविल हे सत्यार्थाने ज्ञानदीप्तीचे आणि शांतीचे नगर बनून राहो!"

पुढील उद्‌गार काढताना माताजींनीही ऑरोविलच्या महत्वावर भर दिला: "पृथ्वीतलावरील निर्मितीची, मानवजात ही काही शेवटीची पायरी नव्हे. उत्क्रांती चालूच असून तीत मानवालाही मागे टाकतील य. नव्या जीवनश्रेणीच्या आगमनाच्या कार्यात आपल्याला सहभागी व्हावयाचे आहे की नाही हे ज्याचे त्यानेच जाणून घेतले पाहिजे. जग जसे आहे त्यावरच ज्यांना समाधान असेल, त्यांच्या दृष्टीने ऑरोविल अस्तित्वात असण्याचे काही कारणच नाही."

ऑरोविल नगरीचा खराखुरा नागरिक कसे बनावयाचे याचेदेखील विवरण माताजींनी केलेले आहे: "पहिली निकड आहे ती सामाजिक, सांस्कृतिक, वांशिक, आणि कुलपरंपरागत या साऱ्या बाह्य देखाव्यांच्या पार्श्वभूमीवर आपण स्वतः म्हणजे काय आहोत, हे ज्यामुळे माणसाला कळून येईल ते आंतर संशोधन करण्याची (आहे). आपल्या अंतरगांच्या अगदी आतल्या गाभ्यात, व्यापक आणि ज्ञानी असे एक विमुक्त सतत्व असते आणि ते आपल्याला त्याचा शोध लागण्याची वाटच पाहात असते आणि तेच आपल्या ऑरोविलमधील जीवनाचे आणि अस्तित्वाचेही क्रियाशील केंद्र बनायला हवे. नैतिक आणि सामाजिक संकेतांतून मुक्त होता यावे यासाठीच मनुष्य ऑरोविलमध्ये रहात असतो, पण या मुक्ततेलाच आपल्या स्वतःच्या अहंभावाच्या, त्याच्या वासनांच्या आणि महत्वाकांक्षांच्या नव्या प्रकारच्या दास्याचे स्वरूप येता कामा नये, वासनांची पूर्ती ही आंतर शोधाचा मार्गच अडवून टाकते आणि तो शोध तर केवळ शांततेत आणि परिपूर्ण निरीहतेच्या पारदर्शक विशुद्धतेतच साध्य होत असतो."

"धनसंपत्तीविषयीची स्वामित्वभावना ऑरोविलच्या नागरिकाने नाहीशीच केली पाहिजे; कारण जे काही आपल्या जीवितासाठी आणि आपल्या कार्यासाठी अपरिहार्यपणे हवे असते ते सारेच या भौतिक जगातल्या आपल्या अपेक्षित् स्थानानुसार आपल्या येथील चरितार्थाच्या दृष्टीने आपल्या स्वाधीन करून ठेवलेले असते. स्वतःच्या आंतरात्म्याशी आपला संपर्क जितका अधिक डोळस असेल तितकाच आपल्याला पुरवलेली साधनेही काटेकोरपणे यथास्थित असतात.

आंतरशोधाच्या दृष्टीने, काम, अगदी शरीरकष्टाचे कामदेखील अपरिहार्यपणे

निकडीचे असते. माणसाने श्रम केले नाहीत, त्याने स्वतःची घडून संवित्ती पार्थिव द्रव्यांत ओतली नाही तर, पार्थिवाचा विकास कधीच घडून यायचा नाही. स्वतःच्या शरीराद्वारा पार्थिवाच्या एखाद्या अंशाला सुसंघटित करण्याची मोकळीक स्वतःच्या संवित्तीला देणे फारच चांगले ठरते. आपल्या स्वतःच्या भोवताली सुव्यवस्था प्रस्थापित करणे आपल्या अंतरंगात सुव्यवस्था निर्माण करण्याच्या दृष्टीने उपकारक असते.

माणसाने जीवनाला सुसंघटित स्वरूप द्यायचे ते बाह्य कृत्रिम नियमांच्या अनुरोधाने नव्हे, तर सुसंघटित अशा आंतर संवित्तीच्या द्वाराच द्यावे. कारण उच्चतर संवित्तीचे नियंत्रण न घालता आपले जीवन प्रवाह पतितासारखे वाहू दिले तर ते आशयहीन आणि अस्थिर बनते. मग पार्थिव द्रव्ये डोळसपणे उपयोगात आणल्यावाचून नुसतीच टिकून रहातात आणि त्या दृष्टीने ती जीवनाचे उधळपट्टीच ठरते.

नव्या जीवश्रेणीच्या आगमनाप्रीत्यर्थ सारी पृथ्वी सज्ज व्हायला हवीच आणि त्या आगमनासाठी डोळसपणे कार्य करण्याची ऑरोविलची इच्छा आहे. ही नवी जीवश्रेणी काय प्रकारची असेल हे हळूहळू आपल्या पुढे प्रकट केले जाईल; आणि मध्यंतरीच्या अवधीत स्वतःला संपूर्णतया ईश्वराच्या ठायीच एकाग्र करून ठेवणे हा सर्वोत्कृष्ट मार्ग होय.

सारांश, श्री अरविंदांच्याच शद्बांत आपण म्हणू या—

"अजूनही दिव्य सत्य वाढेल आणि सुसंवाद विकास पावेल."  
"एक दिवस असा येईल की माणसांना जवळीक आणि  
"एकात्मता वाटू लागेल.  
"तोपर्यंत पुढे टाकलेले प्रत्येक पाऊल म्हणजे  
"कोणता न कोणता लाभच होय.  
"कारण पृथ्वीच्या धूसर आत्म्याला  
"दिव्य प्रकाशात जाग येईतो,  
"तिला अंशाअंशाने दिव्यलोकासमोर खुले झालेच पाहिजे."



# जीवन पट

| | |
|---|---|
| 15 ऑगस्ट 1872 - | श्री अरविंदांचा जन्म, कलकत्ता |
| 1877-79 - | इंग्रजी छात्रावास, दार्जिलिंग |
| 1879-84 - | मँचेस्टर, इंग्लंड |
| 1884-90 - | सेंट पॉल विद्यालय, लंडन |
| 1890-92 - | किंग्ज कॉलेज, केंब्रिज |
| 1892-93 - | भारतात प्रत्यागमन, बडोदा |
| 1901 - | मृणालिनीदेवींशी विवाह |
| 1902 - | बंगालमधील क्रांतिकार्य |
| 1904 - | योगसाधनेचा प्रारंभ |
| 1906 - | बडोद्याहून कलकत्यास प्रयाण |
| डिसेंबर 1907 - | योगी लेले यांची पहिली भेट |
| 4 मे 1908 - | ब्रिटिश शासनाद्वारा अटक |
| 1908-09 - | अलिपूर बॉम्ब अभियोग |
| 6 मे 1909 - | अलिपूर कारागृहातून मुक्तता. |
| फेब्रुवारी 1910 - | कलकत्याहून चंद्रनगरास प्रयाग |
| 4 एप्रिल 1910 - | पाँडिचरीत आगमन |
| 29 मार्च 1914 - | श्री अरविंद व माताजी यांची प्रथम भेट |
| 15 ऑगस्ट 1914 - | तत्वज्ञानास वाहिलेलया ‘आर्य’ मासिकाचे प्रकाशन आरंभिले |
| 22 फेब्रुवारी 1915 - | माताजींचे पाँडिचरीहून प्रयाण |
| 24 एप्रिल 1920 - | पाँडिचरीस स्थायिक होण्यासाठी माताजींचे पुनरागमन |
| जानेवारी 1921 - | ‘आयु’चे प्रकाशन स्थगित |
| 24 नोव्हेंबर 1926 - | सिद्धिदिन |
| 1926 - | आश्रम माताजींच्या हाती सोपवून श्री अरविंदांचा विविक्तवास |
| 24 नोव्हेंबर 1938 - | श्री अरविंदांच्या पायास अपघात व काही साधकांना त्यांच्या सेवेच्या संधीचा लाभ |
| 15 ऑगस्ट 1947 - | श्री अरविंदांच्या 75 व्या जन्मदिनी भारतास स्वातंत्र्यलाभ |
| 5 डिसेंबर 1950 - | महाप्रयाण |

1952 - श्री अरविंद आंतरराष्ट्रीय शिक्षण-केंद्राचे उद्‌घाटन
29 फेब्रुवारी 1968 - 'ऑरोविल'च्या पायाभरणीचा समारंभ

# मराठी ग्रंथ

(सर्व पुस्तकांचे प्रकाशन श्री अरविंद आश्रम प्रकाशन विभाग, पाँडिचेरी 605002 यांनी केले आहे.)

**श्री अरविंद :**

1. इशोपनिषद
2. केनोपनिषद
3. गीतेवरील निबंध
4. भारतीय संस्कृतीचा पाया
5. माता
6. योग समन्वय
7. योगाची मूलतत्वे
8. वेदरहस्य-I ते IV
9. सावित्री
10. श्री अरविंद सावित्री
11. श्री गीता

**श्री माताजी**

1. आदर्श बालक
2. प्रार्थना आणि ध्यान
3. माताजींची प्रवचने
4. शिक्षण-I
5. सत्यगिरीचे आरोहण
6. स्वतःविषयी

**संकलित**

1. जीवन दृष्टी
2. पथ प्रदीप

3. मातृ वाक्सुधा
4. विचार शलाका
5. साधकाची चिंतनिका (I ते XI)

**इतर पुस्तके**

1. तेहमी : *श्री अरविंदांची जीवनकथा*
2. नुलकर, प्रभाकर : *श्री अरविंद : क्रांतिकारक वा योगी*
3. पाळंदे, डी : श्री *अरविंद साधना पद्धती मार्गदर्शन*
4. पंडित, एम. पी. : *जीवन साधनेची सरगम*
5. बनसोडे, एल. व्ही. : *श्री माताजी चरित्र*
6. भिडे, व्ही, लिमये, बी. डी. (संपा.) : *मातृदर्शन*
7. सरदेसाई, जी. एस. : *सयाजीराव गायकवाड यांच्या सहवासात*

**या पुस्तकातील उतारे आश्रमातील खालील मासिकांतून घेतले आहेत :**

मदर इंडिया (1952) संपा. अनिल बरन रॉय
तत्रैव (1958) द मदर : के. डी. सेठना
तत्रैव (1959) अ मेसेज—श्री मदर
बुलेटिन्स ऑफ फिजिकल एज्यूकेशन
बुलेटिन्स ऑफ श्री अरविंद इंटरनॅशनल सेंटर ऑफ एज्यूकेशन

**श्री अरविंदाचे लिखाण असलेली मासिके, वृत्तपत्रे इत्यादी**

आर्य
इंदूप्रकाश
कर्मयोगिन
धर्म
युगांतर
वंदे मातरम

# श्री अरविंदांचे साहित्य

**संस्कृती**

1. हिम्स टू मिस्टिक फायर
2. द रेनेसांस इन इंडिया
3. द सिग्निफिकन्स ऑव्ह इंडियन आर्ट

**साहित्य**

1. व्यास अँड वाल्मिकी
2. कालिदास
3. व्हयूज अँड रिव्हयू
4. लेटर्स ऑव्ह श्री अरविंद (थर्ड सेरीज) ऑन लिट्रेचर
5. द फ्यूचर पोएट्री
6. कॉनव्हर्सेशन्स ऑव्ह द डेड
7. द फॅटम अवर (लघुकथा)
8. कलेक्टेड पोएम्स अँड प्लेज
9. पोएम्स : पास्ट अँड प्रेझेंट
10. लास्ट पोएम्स
11. मोर पौएम्स
12. इलियन
13. रॉडगन
14. सावित्री : अ लेंजड अँड अ सिंबल
15. द व्हिजिअर्स ऑव्ह बसोरा
16. एरिक
17. विक्रर्मोर्शिय (अनु.)
18. पर्सिअस द डिलिव्हरर
19. आनंदमठ (अनु.)

**राष्ट्रीय**

1. बंकिम-तिलक-दयानंद
2. द् नॅशनल व्हल्यू ऑव्ह आर्ट
3. द् आयडियल ऑव्ह द् कर्मयोगिन
4. अ सिस्टम ऑव्ह नॅशनल एज्यूकेशन
5. द् ब्रेन ऑव्ह इंडिया
6. द् स्पीचेस ऑव्ह श्री अरविंद
7. द् डॉक्टरिन आव्ह पॅसिव्ह रेझिस्टन्स

**तत्वज्ञान योग**

1. द् लाइफ डिव्हाइन
2. आयडियलस अँड प्रोग्रेस
3. द् सुपरमॅन
4. इव्होल्यूशन
5. थॉटस् अँड ग्लिम्पसेस
6. द् अवर ऑव्ह गॉड
7. हेराक्लिटस्
8. द् सुपरनॅचरल मॅनिफेस्टेशन अपॉन अर्थ
9. द् प्रॉब्लेम ऑव्ह रीबर्थ
10. ह्यूमन सायकल
11. द् आयडियल ऑफ ह्यूमॅन युनिटी
12. द् योग अँड इट्स ऑब्जेक्टस्
13. द् सिंथेसिस ऑव्ह योग (ऑन योग I)
14. ऑन योग II (कलेक्टेड लेटर्स अपॅन योग I, II)
15. द् रिडल ऑव्ह धिस वर्ल्ड
16. द् लेटर्स ऑव्ह श्री अरविंद ऑन द् मदर
17. द् बेसेस ऑव्ह योग
18. द् मदर
19. लाइफ—लिट्रेचर—योग

## श्री अरविंदांविषयी काही ग्रंथ


| | |
|---|---|
| अय्यंगार, के. आर. श्रीनिवास | *श्री अरविंद, ॲन इन्ट्रोडक्शन,* राव ॲंड राघवन |
| केशवमूर्ती | *श्री अरविंद—द् होप ऑफ मॅन,* दिप्ती पब्लिकेशन |
| गुप्ता, नलिनीकांत | *द् योग ऑव्ह श्री अरविंद* |
| चौधरी, हरिदास ॲंड स्पीलबर्ग, | *द् इंटिग्रल फिलॉसॉफी ऑव्ह श्री अरविंद,* ॲलन ॲंड अनविन |
| चंद्रशेखरम, व्ही | *श्री अरविंदस् द् लाइफ डिव्हाइन* |
| दिवाकर, आर. आर. | *महायोगी,* भारतीय विद्याभवन |
| निरोबरन | *करस्पॉंडन्स विथ श्री अरविंद (2 खंड)* |
| नारायण प्रसाद | *लाइफ इन् श्री अरविंद आश्रम* (2 खंड) |
| पंडित एम. पी. | *साधना इन् श्री अरविंदस् योग* |
| मित्र, एस. के. | *द् मिटिंग ऑव्ह इस्ट ॲंड वेस्ट इन श्री अरविंद्स् फिलॉसॉफी* |
| मित्र, एस. के. | द् लिबरेटर, जायको, 1970 |
| सत्प्रेम | *श्री अरविंद ऑर द् ॲंडव्हेंचर ऑव्ह कॉन्शसनेस,* 1968 |
| सेठना, के. डी. | *द् पोएटिक जिनियस ऑफ श्री अरविंद* |
| सिंग, करण | *प्रॉफेट ऑव्ह इंडियन नॅशनॅलिसम : अ स्टडी ऑव्ह पोलिटिकल थॉट ऑव्ह श्री अरविंद घोष : 1893-1910,* ॲलन ॲंड अनविन |
| साँ-हिलेर, पी. बी. | *श्री अरविंद : द् फ्यूचर इव्होल्यूशन ऑव्ह मॅन* ॲलन ॲंड अनविन |
| पुरानी, ए. बी. | *इव्हिनिंग टॉक्स (1, 2, 3)*<br>*वर्डस ऑफ द् मदर : (3 खंड) 1966*<br>*द् मदर ऑन श्री अरविंद* |
| पुरानी, ए. बी. | *लाइफ ऑफ श्री अरविंद,* 1964 |
| पंडित, एम. पी. | *डिक्शनरी ऑफ श्री अरविंदस् योगा,* 1966 |
| टागोर, रवींद्रनाथ | *होमॅज,* 1907 |

